# ‘ पाणपोई’ची गोडी

‘ पाणपोई ’ हा श्री. विंझे ह्यांचा काव्यसंग्रह आहे. ह्याच्या नांवावरूनच आंतील काव्याच्या विषयाची व कर्त्याच्या आशयाची कल्पना येते. ह्यांत काव्य आहे पण तें भाषांतरित आहे, ह्यांत कवि आहे, पण तो दुसऱ्याचा ऋणाईत आहे आणि ही गोष्ट कर्त्यानें संग्रहाच्या मथळ्यांत मोठ्या विनयानें पण तितक्याच मोकळ्या मनानें स्पष्ट केली आहे. ते स्वतःच म्हणतात कीं, “ ही पाणपोई आहे. हें पाणी मीं दुसरीकडून आणून येथें एकत्रित केलें आहे. हें पाणी जिवंत झऱ्याचें आहे. तें अंतर्बाह्य शुद्ध आहे, स्वच्छ, निर्मळ आहे. त्यांत कर्दम, विचारांचा नाहीं वा भावनांचा नाहीं. हें सात्त्विक जल आहे, पवित्र जल आहे. कावडी नाहीं का हें पवित्र काम करीत ? गंगेचें नाहीं का तें तीर्थ आणून सर्वांना वाटत ? ” अशी ही नम्र भूमिका श्री. त्यज्ञ ह्यांनीं ही “ इंग्रजी काव्यसूक्तींची पाणपोई ” रसिक व भाविक वाचकांना सादर करण्यांत घरली आहे.

हें भाषांतरित काव्य आहे म्हणून सांगितलें; परंतु हें भाषांतर कशाचें ? ह्या काव्याची मूळ भाषा आहे इंग्रजी. त्या इंग्रजी काव्याचें अंतरंग श्री. विंझे ह्यांनीं मराठी भाषेंत उतरविलें आहे. तेव्हां ह्या काव्याचें अंतरंग आहे इंग्रजी, व बहिरंग आहे मराठी; परंतु अंतरंगहि असें निवडलें आहे कीं, त्याची प्रतीति सर्वांना सारखीच यावी. अशा कांहीं भावना असतात व असे कांहीं विचार असतात कीं, त्या भावना व ते विचार देशकालाच्या मर्यादेच्या पलीकडचे असतात. त्यांना देशाचें बंधन नसतें व कालाचें बंधन नसतें; त्यामुळें जरी त्यांचें बहिरंग बदललें, तरी त्याबद्दल परकीपणा वाटत नाहीं. ते विकार अथवा विचार आपलेच आहेतसे वाटतात. खऱ्या काव्याचें हेंच चिरंतनत्व होय. असलें चिरंतन स्वरूपाचें काव्य श्री. विंझे ह्यांनीं आपल्या भाषांतराकरितां घेतलें आहे. चिरंतन विचार काय किंवा

सार्वजनिक भावना काय, त्यांना जेथें असले विचार व असल्या भावना आढळल्या, त्या त्यांनीं नोंद करून भाषांतरित केल्या आहेत. अशा तऱ्हेनें हें एकप्रकारचें वैचारिक आणि भावनिक नवनीतच आहे. श्री. विंसे ह्यांची मधुलिट्‌ची वृत्ति आहे आणि ती त्यांनीं ह्या पुस्तकांत प्रकट केली आहे. हिला म्हटलें आहे त्यांनीं पाणपोई; परंतु ही पाण्याची नसून मधाची आहे.

ह्यांत पुनः विविधता आहे. ती लेखकांची आहे, इतकेंच नव्हे, तर विचारांची आहे व भावनांचीहि आहे. ह्यांत सॉक्रेटीस, बेकन, आइन्स्टाईन, पास्कल यांच्यासारखे विचारवंत आहेत. चॉसर, शेक्सपिअर, मिल्टनसारखे महाकवि आहेत. पोप, ड्रायडन, कोलरीज, कौपरसारखे बौद्धिक काव्य लिहिणारे कवि आहेत. शेली, बायरन, मे, हूड यासारखे भावनिक काव्य लिहिणारे कवि आहेत. ह्यात मेकॉलेहि आहे, आणि टिळकहि आहेत. गांधीजी आहेत आणि रस्किनहि आहे. टागोर आहेत व उमरखय्यामहि आहे. लिंकन आहे आणि वॉल्टेरहि आहे. किपलिंग आहे आणि ब्राउनिंगहि आहे. वर्डस्वर्थ, रॅझेटी, एलाव्हीलर, विलकॉक्स वगैरे तर आहेतच. अशा कितीतरी प्रतिभावंतांचीं वचनें ह्या पुस्तकांत दिलीं आहेत.

ही अशी लेखकांची विविधता ह्या पुस्तकांत आढळून येते, तशीच विषयांचीहि आढळून येते. कांहीं नाहीं तरी अठ्ठावीस निरनिराळीं प्रकरणें या पुस्तकात आहेत व सर्व उताऱ्यांचें वर्गीकरण करून, त्या त्या विषयाखालीं ते दिले आहेत. विषयांत 'जीवन, जग, मनुष्य' हा एक विषय आहे, तर 'ज्ञान, अज्ञान, सुज्ञ, मूर्ख' हा दुसरा विषय आहे. 'स्तुति, प्रसिद्धि, निंदा' हा एक आहे, तर 'काळ, मरण' हा दुसरा एक आहे. कांहीं उतारे भक्तिपर, तर कांहीं उपदेशपर, तर तिसरे कांहीं देशभक्ति, स्वातंत्र्यपर असे आहेत. कांहीं मनोव्यापाराचे आहेत, तर कांहीं हृदयाच्या व्यापाराचे आहेत. ह्या उताऱ्यांत प्रेमाला व निसर्गालाहि योग्य ती जागा दिलेली आहे. शेवटच्या संकीर्ण सदरांत कितीतरी लेखक व विषय आले आहेत. ह्या

लेखकांच्या व विषयांच्या निर्देशांवरून हें स्पष्ट दिसेल कीं, जेथें जेथें म्हणून श्री. विंझे ह्यांना ज्ञानाचा कण किंवा भावनेचा किरण आढळला, तो तो त्यांनीं मोठ्या आक्षेपानें ह्या पुस्तकांत नमूद करून तो मराठी वाचकांना सादर केला आहे.

ह्या पुस्तकाची मांडणी ही अशी आहे. ह्यांत पुनः लेखकानें आणखीहि सोय केली आहे. इंग्रजींतील मूळ उतारा पानाच्या डाव्या बाजूस व त्याचें मराठींत भाषांतर उजव्या बाजूस समोरासमोर दिल्यामुळें वाचकांची मोठी सोय झाली आहे. हें पुस्तक सहज जरी चाळलें, तरी वाचकांच्या ज्ञानांत तर भर पडेलच, परंतु त्यांच्या मनोविकारांचीसुद्धां शुद्धि होईल, अशी त्यांतील वचनांची योग्यता आहे. ह्या वचनांनीं करमणूक होईल, मनाला चमत्कृतीचा आल्हाद वाटेल व पुनः व्यवहाराचें शिक्षण मिळेल.

तेव्हां श्री. विंझे ह्यांचा हा तर उद्देश आहेच, परंतु त्यांचा आणखीहि एक उद्देश आहे आणि तो म्हणजे भाषांतराचा. एका भाषेंतील भांडार दुसऱ्या भाषेंत केवळ मांडणें म्हणजे भाषांतर नव्हे. शब्दाला शब्द ठेवणें हें भाषांतर खरें, परंतु तें औपचारिक भाषांतर होय; तें व्यावहारिक भाषांतर होय. तें आंतरिक भाषांतर नव्हेच नव्हे. औपचारिक किंवा व्यावहारिक भाषांतरानें एका भाषेंतील अर्थ दुसऱ्या भाषेंत समजेल, परंतु तो अंतःकरणाला पटणार नाहीं. अर्थ अंतःकरणाला पटवावयाचा असेल, तर तें भाषांतर आंतरिकच असलें पाहिजे. औपचारिक किंवा व्यावहारिक भाषांतरें मराठींत पुष्कळच आहेत; परंतु आंतरिक भाषांतरें मात्र फार फार कमी आहेत. आंतरिक भाषांतर म्हणजे तरी काय, हा त्यानंतरचा साहजिकच प्रश्न येतो.

एखाद्या भाषेंतील विचार व भावना दुसऱ्या भाषेंत उतरवतांना दोन्ही भाषांचें चांगलें ज्ञान असायला पाहिजे हें अगदीं स्पष्ट आहे. परंतु त्यांतहि केवळ दोन्ही भाषांतील शब्दांचें ज्ञान असून चालत नाहीं. शब्दाला अन्वर्थक शब्द पुष्कळ असतात. त्या शब्दांपैकीं योग्य शब्द निवडणें हें फार कठिण आहे. शाब्दिक ज्ञान हें बाह्य आहे. तें

कधींहि पुरें पडत नाहीं. शब्दांच्याहि पलीकडचें ज्ञान असलें पाहिजे. भाषेंतील प्रत्येक शब्दाच्याभोंवतीं उच्चाराचें एक वलय असतें; तसेंच अर्थाचेंहि एक वलय असतें. प्रत्येक शब्दाला एकप्रकारचा ताल असतो, तसाच एक प्रकारचा तोलहि असतो. कोणत्याहि अव्वल दर्जाच्या प्रतिभावंताच्या मुखांतून काव्य लिहितांना वाटेल ते शब्द बाहेर पडणार नाहींत. तो असेच शब्द योजील कीं, त्यांचा ताल योग्य आहे व तोलहि पण योग्य आहे; तो असेच शब्द योजील कीं, त्यांचें उच्चारांचें व अर्थाचें वलय त्यानें बरोबर ओळखलें आहे. जी गोष्ट मूळ प्रतिभावंत लेखकाची, तीच गोष्ट *भाषांतरकर्त्याची*. भाषांतरकर्त्याला तर एकाच भाषेंतील शब्दांचा ताल व तोल किंवा त्यांचीं दोन्ही वलयें पाहून चालत नाहीं. त्याला दोन्ही भाषांतील शब्दांचीं हीं अंगें पाहावीं लागतात. हीं झाली शब्दांची गोष्ट.

त्यानंतर भाषेची मोडणी किंवा भाषेचें वळण. ह्याहि बाबतींत भाषांतरकर्त्यांवर मोठी जबाबदारी असते. ज्या भाषेंतून व ज्या भाषेंत भाषांतर करावयाचें आहे त्या दोन्ही भाषांचीं वळणें त्याला माहिती असावीं लागतात. भाषेच्या वळणांत वाक्यरचना येते, वाक्प्रचार येतात, सुभाषितें-म्हणी येतात. वाक्प्रचार व म्हणी वगैरे त्या त्या समाजाच्या व्यवहारावरून बनत असतात. प्रत्येक समाजाचे व्यवहार जसे निराळे, तसे त्याच्या वाक्प्रचार—म्हणींहि पण निराळ्या असतात. तेव्हां भाषांतरकर्त्याला दोन्ही भाषा बोलणाऱ्या दोन्ही समाजांच्या व्यवहारांतील *मर्म* समजलें पाहिजे. हें *मर्म* जर भाषांतरकर्त्यानें नीट समजावून घेतलें नाहीं, तर त्याच्या हातून एका भाषेंतील वाक्यरचनेच्या अंगप्रत्यंगाचें भाषांतर नीट होणार नाहीं. थोडक्यांत म्हणजे भाषांतरकर्त्याला दोन्ही भाषांचें बाह्य स्वरूप तर पूर्ण अवगत असायला पाहिजेच, परंतु त्याशिवाय त्या भाषांचें आंतरतत्त्वहि अवगत असायला पाहिजे. दोन्ही भाषांचा *गाभा* त्यानें जाणला पाहिजे. दोन्ही भाषांचा आत्मा त्यानें ओळखला पाहिजे.

ही झाली शब्द व वाक्यरचना यांची बाब. ही तर कठिण खरीच,

परंतु त्याहिपेक्षां कठिण आणखी एक बाब आहे आणि तीहि चांगल्या भाषांतरकर्त्याला करावी लागते. ही बाब म्हणजे मूळ भाषेत गोठविलेल्या विषयासंबंधीं व आशयासंबंधीं. त्यांतील विषय भाषांतर-कर्त्याला नीट समजला तर पाहिजेच, परंतु त्यांत आविष्कृत केलेल्या भावनाहि त्याला समजल्या पाहिजेत. ते विचार व त्या भावना, ज्या अवस्थेंत मूळ लेखकानें प्रकट केल्या, त्या अवस्थेंत भाषांतकर्त्यानें आपणांस नेलें पाहिजे. थोडक्यांत म्हणजे, मूळ लेखक व त्याचा अनुवादक हे दोघे एकरूप झाले पाहिजेत. मूळ लेखकाशीं अनुवादकानें तन्मय झालें पाहिजे. मूळ लेखक जे कांहीं विचार 'विचरला' व ज्या कांहीं भावना 'भावला' तेच विचार अनुवादकहि 'विचरला' पाहिजे व त्याच भावना तो 'भावला' पाहिजे. अशी अगदीं एकान्तिक अवस्था झाली म्हणजेच मूळचा अनुवाद चांगला वठतो. समीक्षकाला नाहीं का मूळ लेखकाशीं तन्मय व्हावें लागत? तीच गोष्ट अनुवाद करणाऱ्याची आहे. कवीची काव्य लिहितांना असलेली वृत्ति व अनुवादकाची त्याचा अनुवाद करतांना असलेली वृत्ति, ह्या दोन्ही एक झाल्या पाहिजेत. त्यांचा प्रकारहि एकच असावा लागतो व त्यांचें प्रमाणहि पण एकच असावें लागतें. असें झालें तरच मूळ व त्याचा अनुवाद हे परस्परान्वयी होतात.

अशा ह्या चांगल्या अनुवादाच्या बाबतींत अत्यंत जरूर असणाऱ्या गोष्टी आहेत. त्या सर्व गोष्टी साधल्या, तर फार चांगलें. तो अनुवाद मूळाबरहुकूम आदर्श असाच होईल. ह्या सर्व गोष्टी असणें चांगलें खरें, परंतु त्या सर्वच एखाद्याजवळ असतातच असें नाहीं.

आतां भाषांतरा–भाषांतरांतसुद्धां फरक असतो. सर्व भाषांतरें सारखीं कधींच नसतात. गद्याचें भाषांतर निराळें, पद्याचें भाषांतर निराळें. गद्यांत पुनः शास्त्रीय गद्य निराळें, ललित गद्य निराळें. ललित गद्यांत पुनः कादंबरी गद्य निराळें, विनोदी गद्य निराळें व आत्मनिष्ठ भावनिष्ठ गद्य निराळें. पद्यांतहि त्याचप्रमाणें वर्णनात्मक

पद्य निराळें, कथनात्मक पद्य निराळें व भावनिक पद्य निराळें. त्यांतल्या त्यांत बोलायचें तर झालें, तर साधारणपणें गद्याच्यापेक्षां पद्याचा अनुवाद करणें कठिण आहे. त्यांत पुनः भावनिक पद्याचा अनुवाद करणें कठिण आहे. त्यांतहि पुनः त्या भावनिक पद्याचा अनुवाद पद्यांतच करणें त्याहिपेक्षां कठिण आहे. कारण त्या अनुवादांत भाषेचीं, भावनांचीं वर सांगितलेलीं सर्व बंधनें संभाळून पुनः वृत्ताचीं बंधनें पाळावीं लागतात.

हीं सर्व बंधनें पाळून आपल्या मराठींत काय किंवा इतर भाषांत काय, भाषांतरें झालींच नाहींत असें मात्र नाहीं. अगदीं प्राचीन काळांत झालेलीं भाषांतरें रूपांतरें आहेत म्हणून, वाटलीं तर सोडा. नरेंद्राचें रुक्मिणी स्वयंवर; भास्करभट्टाचीं शिशुपालवध व उद्धवगीता हीं काव्यें; एकनाथाचीं भागवत, रुक्मिणीस्वयंवर, भावार्थ रामायण हीं काव्यें; महालिंगदासाचें पंचतंत्र; रामदासांचीं रामायण काण्डें; कृष्णयाज्ञवल्कीचा कथाकल्पतरु; कृष्णदयार्णवाचा प्रचण्ड ग्रंथ हरिवरदा; श्रीधराचीं पांडवप्रताप वगैरे आख्यान काव्यें; मुक्तेश्वर, मोरोपंत वगैरेंचें भारती काव्य; मोरोपंतांचीं रामायणें—वगैरे काव्यांत ठिकठिकाणीं कवींनीं आपल्या प्रतिभा व कल्पना चालविल्या असल्या, तरी मूळ संस्कृतचा अनुवाद त्यांत अजिबात नाहीं असें छातीठोक कोणीहि म्हणूं शकणार नाहीं. मी म्हणतों, शब्दशः जरी हीं भाषांतरें नसलीं, व त्यांत लेखकांनीं प्रतिभाकल्पनांचा आविष्कार केला असला, तरी मूळ लेखकाच्या प्रतिमेचीं व कल्पनांचीं थोडीं तरी रूपांतरें त्यांत आहेतच कीं नाहीं ! परंतु हीं प्राचीन काळचीं रूपांतरें म्हणून सोडा. अगदीं अलीकडच्या काळांत परशुरामपंत तात्या गोडबोले, कृष्णशास्त्री राजवाडे, गणेशशास्त्री लेले, हे फार उत्तम भाषांतरकार होऊन गेले. लेलेशास्त्री यांचीं भाषांतरें तर मूळार्थास धरून असून पुनः अत्यंत सरस व शुद्ध असल्याबद्दल त्यांची प्रशस्ति त्या काळांत झाली. आगरकरांचें हॅम्लेट, कोल्हटकरांचें ऑथेल्लो, केळकरांचें नाटिका, परांजपे यांचें 'मानानीराव' हीं भाषांतरें उत्तम म्हणून प्रसिद्ध आहे.

परंतु हींहि पूर्वीचीं म्हणून सोडून देऊं. होमरचें, इलियडचें, कुराणाचें, गीतगोविंद-मेघदूत ह्या ग्रंथांचीं भाषांतरें अलीकडेच झालेलीं आहेत. गीतगोविंद व मेघदूत ह्यांच्या भाषांतरांत वृत्ताचीं बंधनें पाळून पुनः मुळांतील प्रसादहि उतरला आहे. ह्याच भाषांतर-कर्त्यानें गोस्वामी तुळसीदास ह्यांचें 'रामचरितमानस' च्या पहिल्या भागाचें भाषांतर परवांच केलें आहे. हें भाषांतर चांगलें वठल्याबद्दल भाषांतरकार डॉ. श्रीखंडे ह्यांचें अभिनंदनच करावयास हवें. स्वामी प्रज्ञानानंद ह्यांनीं केलेलें भाषांतर असेंच अतुलनीय आहे. रा. ब. गोडबोले ह्यांचें शाकुंतलाचें भाषांतर असेंच नमुनेदार झालें आहे. त्यांच्यापासूनच श्री. विंझे ह्यांनीं स्फूर्ति घेतली. इतर भारतीय भाषांमध्यें सुद्धां झालेलीं कांहीं भाषांतरें उल्लेखनीय आहेत. गीतगोविंद व अमरुशतक ह्या काव्यांचीं केशव हर्षदराय ध्रुव ह्यांनीं गुजराती भाषेंत भाषांतरें केलीं आहेत. हीं तर कांहीं बाबतींत मूळाइतकींच नव्हे, तर त्यापेक्षां अधिक सरस' झालीं आहेत, असें तज्ज्ञ लोक म्हणतात. उमरखय्यामच्या रुबायाच्या, फिट्झेराल्डनें केलेल्या इंग्रजी भाषांतराची हीच गोष्ट सांगतात. कै. माधवराव पटवर्धनांनींहि रुबायांचें भाषांतर करण्याचा दोनदां प्रयत्न केला. पहिल्या प्रयत्नानें खुद्द त्यांचेंच समाधान झालें नाहीं. श्री. पां. बा. गाडगीळ ह्यांचें कॅपिटलचें व श्री. कोल्हटकर ह्यांचें पातंजल योगसूत्राचें हीं भाषांतरें, प्रयत्नांचें सातत्य व प्रज्ञेचा प्रकर्ष दाखवितात. बडोद्याच्या सयाजीग्रंथमालेंत कांहीं उत्तम भाषांतरें प्रसिद्ध झालीं आहेत. भाषांत-रांच्या बाबतींत मराठी भाषा चांगली संपन्न आहे, हें ह्या थोड्या उदाहरणांवरून स्पष्ट होईल.

परंतु ह्या सर्व भाषांतरकारांत काव्याला आणि त्यांत पुनः व्यक्ति-निष्ठ अशा भाव काव्याला हात घालणारे फार विरळा आहेत व त्याचें कारण उघड आहे आणि हेंच ह्या 'पाणपोई' काव्य-संग्रहाचें वैशिष्ट्य आहे. ह्यांत जें मूळ साहित्य भाषांतरासाठीं निवडलें आहे, तें कांहीं प्राशिक आहे, तर कांहीं प्रातिभिक आहे व भाषांतरकर्त्यानें मूळ लेखकाच्या प्रज्ञेत व प्रतिभेंत शिरण्याचा—होता

होईल तों त्यांच्याजवळ जाण्याचा–प्रयत्न केला आहे. ती मूळ ज्योत भाषांतरकर्त्यांत कदाचित् नसेल; परंतु त्या मूळ ज्योतीला लावून त्यानें आपली ज्योत सिद्ध केली आहे हें मात्र खास. म्हणूनच श्री. विंझे ह्यांचा हा प्रयत्न मी स्वागतार्ह समजतों व त्याबद्दल मी त्यांचें अभिनंदन करतों. वरें हा त्यांचा नेहमींचा व्यवसाय नव्हे. व्यवसाय पाहिला तर निव्वळ भौतिक, निव्वळ रासायनिक. परंतु त्यांनीं रासायनिक व्यवसायांत आपले हात व बुद्धि दिली असली, तरी अंतःकरण मात्र त्यांनीं दिलेलें दिसत नाहीं. तें त्यांनीं शास्त्रांना न वेचतां हृदयाच्या सद्भावनांना वेंचलें. त्याच्याशिवाय हा असला बाह्यतः किचकट परंतु आंतून रम्य प्रयत्न त्यांच्या हातून पार पडता ना. हें त्यांचें भाषांतर भाषेच्या दृष्टीनें तर चांगलें आहेच, परंतु आंतील विचारांच्या व भावनांच्या दृष्टीनेंहि चांगलें आहे. व्यक्तीच्या व समाजाच्या विकासाला पोषक असेच आंतले विचार व भावना आहेत. सध्यांचा काळ आंतर भारतीचा आहे. आंतरराष्ट्रीयत्वाचा आहे. ह्या अशा काळांत ह्याचा चांगला उपयोग व्हावा अशी अपेक्षा आहे.

उतारे व त्यांचीं भाषांतरें समोरासमोर देण्यांत लेखकानें वाचकांची सोय पाहिली आहे, हें वर सांगितलें. त्याचा उद्देश आणखीहि एक आहे. भाषांतर हें कितपत मूळाला धरून आहे, हें त्यावरून सहज ठरवितां येईल. ह्या पुस्तकांतील चांगल्या चांगल्या नमुनेदार भाषांतरांचीं उदाहरणें देणें स्थलाभावीं शक्य होणार नाहीं; परंतु तीं देण्याचा मोहहि पण आवरणें शक्य होणार नाहीं.

*पहिलाच ' जीवना ' चा उतारा पहा. मूळ पुढीलप्रमाणें आहे–*

*My life is like the summer rose,*
That opens to the morning sky,
But ere the shades of evening close,
-- Is scattered on the ground—to die.

ह्यांतील कल्पनासाम्य व शब्दांचें ध्वनिसाम्य पुढील अनुवादांत कसें उतरलें आहे पहा—

> उन्हाळ्यामध्यें जें सुमधुर उषःकालिं विकसे ।
> गुलाबाऐसें त्या, क्षणिक मम हें जीवन दिसे ॥
> जसे संध्याच्छाया पसरति तयापूर्वीच क्षणीं ।
> पडे पिस्कारोनी धरणिवरती—जाय मरूनी ॥

चौथ्या उताऱ्यांतील शेवटच्या ओळींतील 'Do' चा अर्थभेद कसा भाषांतरांत उतरला आहे पहा. उतारा लॉंगफेलोचा आहे. मूळ ओळ पुढीलप्रमाणें आहे— But if we do well here, we shall do well there. आतां भाषांतर पहा—

> …येथें । सत्कार्या जे करितो त्यांचा सत्कारची घडे तेथें ॥

पुढचा ( ९ वा ) शेक्सपिअरचा उतारा असा आहे—There is a tide in the affairs of man, which when taken at the flood, leads on to fortune. आतां ह्याचें भाषांतर पहा.

> भरति ओहटी जीवनसागरिं नित्य; संधि साधुनी परी ।
> भरती स्वारी, भरतीवरती, भाग्यलक्ष्मि त्यांतेंच वरी ॥

सोळावा उतारा असाच चांगला साधला आहे. त्यांत Then steal away चें भाषांतर " जाई बा……तूं चोरट्या पाऊलीं " असें केल्यानें मूळांतील कल्पनाच आपल्यासमोर येते. भाषांतराला पुढचें-पाठीमागचें थोडेंतरी वाचावें लागतें. आतां कांहीं नुसत्या ओळीच देतों.

( १-७ ) मूळ— A minute to smile
and an hour to weep in.

भाषांतर—क्षणाचाच हो वेळ लाभे स्मिताला ।
घडी एक संपूर्णची रोदनाला ॥

मूळ–A pint of joy to a peok of trouble,

भाषांतर–मिळे एक तोळ्याभराचेंच सुख ।
परि खांडि खंडि भरोनीच दुःख ॥

मूळ–And never a laugh,
but the moans come double.

भाषांतर–जगीं खद्‌खदोनी कधीं ना हंसावें ।
दुहेरी परी तीव्रतेनें कण्हावें ॥

( १–१५ ) For some bleak pittance ever compelled to roam.

नित्याचें फिरणें कपाळिंच, घडया बांधून पोटावर ।

( १–१७ ) With heaviness he carts his eyes.

भारावल्या नयनिं हा पुढतींच पाहे ।

( १–३५ ) Youth is a blunder—Manhood a struggle, and Old-age a regret !

स्खलनपूर्ण असे नवयौवन । सतत युद्धाचि मध्यम जीवन ॥
उरतसे अनुताप जरेमधें । अहह ! जीवन सर्व असेंच तें ॥

( १–४५ ) If life is unhappy,
it is a burden difficult to bear !
If thoroughly happy, it is dreadful
to be deprived of it !

मानूंच दुःखमय या जर जीवनास ।
तो भार होय अति दुर्वह मानवास ॥
त्या सौख्यपूर्ण समजूं तर सोडणें तें ।
अत्यंत घोर भयदायि नरास होतें ॥

( १–५० ) There on the nurse's lap,
a new born child,

We saw thee weep,
while all around thee smiled,
So live, that sinking in thy last long sleep
Thou still mayest smile,
while all around thee weep.

तूं जन्मतां जरि स्वतां रडलास, बाळा !
आनंदुनीच हंसला परि लोक सारा ।
ऐसेंच पुण्य कर, कीं मरतांहि तूं रे ।
तूं हंसशील, परि विश्व रडेल सारें ॥

हे कांहीं पहिल्या सदरांतील उतारे दिले. असेच नमुनेदार उतारे व त्यांचे अनुवाद इतर सदरांत आहेत. ह्या उताऱ्यांचा केवळ निर्देश करतों. वाचकांना प्रत्यक्ष वाचूनच त्याचा पडताळा येईल. पुढें प्रथम सदर व नंतर उतारा असा क्रम दिला आहे.

| प्रकरण | सूक्तिक्रमांक | प्रकरण | सूक्तिक्रमांक |
|---|---|---|---|
| २– | १३, १९, २४, २६, ३१. | ३– | ३, ८. |
| ४– | १, ८, ११, १४. | ५– | १. |
| ६– | १, २, ३, ६, १३, १४. | १०– | १, २, ७, ८. |
| ११– | ३. | १२– | ८. |
| १३– | १. | १४– | २. |
| १५– | ४, ७, १२, १८. | १६– | ३. |
| १८– | २, ११, १३. | २३– | १. |

ह्या पुस्तकांतील सर्व उतारे अगदीं सोज्वळ, सद्विचारांचे व सद्भावनांचे आहेत, हें खरें; परंतु त्यांत प्रेमाचे, शृंगाराचे, रंगेलपणाचे उतारे नाहींत असें मात्र नाहीं. भाषांतरकार झाला म्हणून काय झालें ? त्यांच्यांतला रंगेलपणा केव्हांतरी डोकावणारच. उदाहरण म्हणून सहाव्या सदरांतील चौदावा उताराच येथें देतों. भाषांतरांत कशी मौज आहे पहा—

मूळ—A woman looks
another woman up and down to see
What she is wearing; a man,
what she is clothing.

भाषांतर—स्त्री स्त्रीला वरखालि जों बघतसे तद्वस्त्र ती पाहते ।
पाहे तें नरही; परंतु बसनीं ती काय आच्छादिते ? ॥

हें वाचलें म्हणजे कै. कोल्हटकर साहिलकरांच्या एका नाटकांतील वाक्याची आठवण होते.

वर दिलेले अनुवाद आम्हांला चांगले वाटले. इतरांना चांगले न वाटतील; हा रुचिभेदाचा प्रश्न आहे. मुख्य गोष्ट हीच पाहावयाची कीं मूळांतील शब्दाला अन्वर्थक शब्द आहे कीं नाहीं, त्या मूळ शब्दाचा नाद प्रतिशब्दांत आहे कीं नाहीं, मूळ कल्पना अनुवादांत आली आहे कीं नाहीं, मूळांतील भावना अनुवादांत उतरली आहे कीं नाहीं, व शेवटीं म्हणजे मूळांतील आविष्काराच्या गतीप्रमाणें अनुवादांत छंदाची योजना केली आहे कीं नाहीं. ह्या गोष्टींचा पडताळा नीट आला कीं ओळखावें कीं, अनुवादकानें आपलें काम प्रामाणिकपणें केलें आहे. वर दिलेले सर्वच उतारे पडताळून पाहण्याइतकि वेळ नसला तर निदान लॉंगफेलोचें 'साम ऑफ लाइफ्' (पान ८० ते ८३) व 'स्लेव्हज ड्रीम' (पान ९२ ते ९७); थॉमस मूरचें 'हार्प्' (पान ५० ते ५१); लें हंटचें 'अबू बेन्' (पान ५४ ते ५७); हुडचें 'सॉंग ऑफ् दि शर्ट' (पान ७४ ते७५); हेन्री वॉटनचें 'हॅपि' मॅन (पान ११४ ते ११५), वर्डस्वर्थचें 'लेट नेचर बी युवर टीचर' (पान १७८); न्यूमन व लाइट्च्या प्रार्थना (पान १८५ ते १८७) व शेलीचें 'टु ए स्कायलार्क;' (पान १९८ ते २०९) हीं इतकीं काव्यें व त्यांचे अनुवाद पडताळून पाहिले तरी भाषान्तरकर्त्यांचें सामर्थ्य बरोबर अजमावितां येईल. इतकेहि वाचावयास वेळ नसला, तर निदान एकाच शेलीचें

'रुबायुलार्क्' हें भावकाव्य व त्याचा अनुवाद (पान १९८ ते २०९ ) वाचला तरी काम भागेल. त्यावरून भाषान्तरांतील सौरस्य समजेल.

हें सर्व आम्हीं लिहिलें. पण यांचा अर्थ असा नव्हे कीं, श्री. विंझे ह्यांच्या प्रयत्नांत दोष कांहींच नाहीं. कांहीं ठिकाणीं शब्द-दोष आहेत, तर कांहीं ठिकाणीं वृत्तदोष आहेत. कांहीं ठिकाणीं मूळ शब्दांतला नाद उतरला नाहीं, तर कांहीं ठिकाणीं कल्पना नीट उतरली नाहीं. कांहीं ठिकाणीं विचारसंवाद जुळला नाहीं, तर कांहीं ठिकाणीं भावनासंवाद जुळला नाहीं. Scattered ला 'पिरकारोनी' पेक्षां विरकारोनी, 'Pale' ला 'पुसट' पेक्षां पिक्कट, Sporting ला 'वसे' पेक्षां 'विलसे,' A pint of joy ला 'तोळाभर' पेक्षां पेलाभर, हे असे शब्द अधिक अन्वर्थक होतील. परंतु असे अधिक अन्वर्थक शब्द सांगणें सोपें आहे. भाषांतरकर्त्यांची आणि त्यांत पुनः वृत्तबंधनें पाळायचीं अडचण आपण पाहिलीच पाहिजे. Stolen Kisses ( ६–३ ) मधील कल्पना नीट उतरली नाहीं. तशाच क्षमा आणि कृपा ( ६–२ ) ह्यांमध्यें संभ्रम झाला आहे. Endure ( ६–१३ ) म्हणजे 'क्षम्य' नव्हे 'सह्य' आहे. शेक्सपियरच्या उताऱ्यांतील ( ८–५ ), स्टीफनच्या ( ९–५ ) कल्पनाहि अनुवादांत विसंवादी वाटते. असे कांहीं दोष आहेत. पण ते अगदीं थोडे आहेत व जे कांहीं थोडे आहेत, त्यानें अनुवादाच्या एकंदर उठावाला कमीपणा येत नाहीं.

पण एक गोष्ट मात्र ह्या अनुवादांत खटकते आणि ती फार खटकते. आणि ती म्हणजे ह्या उताऱ्यांचा व त्याबरोबर त्यांच्या अनुवादांचाहि तोकडेपणा. त्यांत संपूर्ण असे उतारे थोडे आहेत. पुष्कळ अपूर्ण आहेत; व ते इतके अपूर्ण आहेत कीं, कोठें चार तर कोठें दोन, इतकेंच नव्हे तर कोठें एकच ओळ उतारा आहे. श्री. विंझे यांची दृष्टि हे तोकडे उतारे निवडण्यांत वेचक दिसते खरी, परंतु वाचकांचें त्यानें फार असमाधान होतें. जरा कोठें गोडी चाखण्यास सुरुवात करावी तों ती मुळीं संपूनच जाते. विचारांत किंवा भावनांत सातत्य आढळत

नाहीं, अनुस्यूतात आढळत नाहीं किंवा अनुक्रमहि आढळत नाहीं. पुस्तक कोठेंहि उघडावें, वाचावें व बंद करावें. त्यात साखळी तुटण्याची किंवा सांधण्याची भीति नाहीं.

*ही जरी गोष्ट असली, तरी श्री. विंझे ह्यांचें अनुवादकौशल्य ह्यांत* दिसतें हें मात्र खरें आहे. दोन्ही–इंग्रजी व मराठी–भाषांचें मर्म ते जाणतात. काव्याच्या शब्दामागें असलेला भावार्थ व कवीच्या मनाची अवस्था ते पूर्ण जाणूं शकतात. त्याचा योग्य आविष्कार ते करूं शकतात. अनुवादाला जरूर असणारें शब्दसामर्थ्य व वृत्तसामर्थ्यहि *त्यांच्याजवळ आहे. अनुवादयांशीं तन्मयहि ते होऊं शकतात. त्यांच्याजवळ सद्विचार आहेत, सद्भावनाहि आहेत.* सद्विचारी व सद्भावनी *माणसालाच इतर ठिकाणीं वसत असलेले* सद्विचार व सद्भावना दिसूं शकतात. ( अगदीं मात्र अर्वाचीं सूक्ति पान १५८–१५९ सूक्ति ४२ पहा. ) तोच हे प्रज्ञेचे कण व प्रतिभेचे किरण शोधूं शकतो. हे *कण व किरण श्री. विंझे यांनीं शोधले व ते मराठींत परिष्कार करून* वाचकांच्यापुढें पाणपोईच्या रूपानें ठेवले,–ह्याबद्दल ते स्तुतीस पात्र आहेत. ह्या पाणपोईनें त्यांचें तर समाधान झालेंच आहे, तसेंच वाचकांचें होवो ! *ही पाणपोई उघडून त्यांनीं केलेली प्राथमिक तयारी त्यांना दुसऱ्या एखाद्या प्रतिभावंताच्या संपूर्ण व अनुस्यूत प्रातिभिक प्रयत्नाचा अनुवाद करण्याची किंवा स्वतंत्र अशा स्वतःचा प्रातिभिक* आविष्कार किंवा प्रयत्न करण्याची स्फूर्ति देवो !

श्रावण शु. १, शके १८७६. } कृ. पां. कुलकर्णी
मुंबई.

---

## अनुवादकाची भूमिका

मी कांहीं साहित्यिक नाहीं—कवि तर नाहींच नाहीं. गेल्या २–४ वर्षांच्या रुग्णावस्थेंत मनाला विरंगुळा म्हणून इंग्रजी, संस्कृत हिंदी वगैरे भाषांतील सुभाषितांचीं मराठी वृत्तबद्ध भाषांतरें करण्याचा छंद लावून घेतला. सूक्ति नुसत्या संग्रहीत करण्याचा नाद लहानपणापासून होता. अनेक समरुचि मित्रांनीं दिलेलीं कात्रणें, हस्तलिखितें, पाठ्यपुस्तकें, म्हणींचे संग्रह, पूर्वींच्या काळच्या दैनंदिन्या व दिनदर्शिका (यांच्या प्रत्येक दिनांकावर एकेक सूक्ति असे) अशा तऱ्हेनें जिथूनजिथून सूक्ति मिळाली तिथूनतिथून ती मी मधमाशीच्या परिश्रमानें संग्रहीत केली. पाठांतरांतूनहि ज्या येत होत्या त्या घेतल्या व ठोकळमानानें त्या विषयवारीनें लावल्या; त्यांच्या भरीला त्या त्या विषयांवरील ४ ओळींपासून २०–२४ ओळींचीं छोटीं काव्येंहि त्यास जोडून दिलीं व हा संग्रह सिद्ध केला. त्यांचीं मीं केलेलीं भाषांतरें रुग्णावस्थेंत मला भेटावयास येणाऱ्या मित्रांना फार आवडलीं, म्हणून तीं महाराष्ट्रांतील थोर व ज्येष्ठ साहित्यिक, विद्वान्, रसिक व कवि,—महाराष्ट्रशाकुंतलकर्ते श्री. के. वि. गोडबोले, माझे गुरु श्री. चिं. अ. तुळपुळे, प्रा. श्री. म. माटे, डॉ. के. ना. वाटवे, डॉ. शं. दा. पेंडसे, स्वातंत्र्यवीर डॉ. वि. दा. सावरकर, श्री. ग. वि. केतकर, श्री. शं. रा. दाते, प्रा. द. के. केळकर, प्रा. रा. श्री. जोग, डॉ. ग. श्री. खैर, सुप्रसिद्ध टीकाकार श्री. के. क्षीरसागर, डॉ. न. का. घारपुरे, राजकवि 'यशवंत,' प्रा. वि. ह. कुलकर्णी इत्यादींच्या पुढें ठेवलीं. (या सर्वांचे उत्कृष्ट अभिप्राय आले, त्यांचा सारांश पुस्तकाचे शेवटीं जोडला आहे.) यानें उत्तेजना मिळून, सह्याद्रि, वाङ्मयशोभा, चित्रमयजगत्, इत्यादि मासिकांतून यांतले बानगी-दाखल थोडे भाग प्रसिद्ध केले. यामुळें श्री. य. गो. जोशी यांचा विशेष परिचय होऊन ('प्रसाद' मध्यें ऋग्वेदी संध्या, पुरुषसूक्त व परापूजा यांचीं मीं केलेलीं मराठी कवितावद्ध भाषांतरें त्यांनीं हौसेनें

छापिली व त्यांची पुस्तिकाही काढून दिली ) त्यांनीं प्रथम 'प्रसाद'च्या वाचकांना माझ्या भावी पुस्तकाचा पहिला ' प्रसाद ' मिळावा व तोच पुस्तकरूपानें नंतर इतर वाचकांना द्यावा ही कल्पना काढली. त्यास अनुसरून प्रसादच्या दिवाळी १९५३ ते जुलै १९५४ इतक्या अंकांत माझा संग्रह क्रमशः प्रसिद्ध झाला व तोच आतां पुस्तक-रूपानें प्रसिद्ध होत आहे.

या पुस्तकाला नांव काय ठेवावें याचा विचार करतां ' रत्नांचा पाऊस, ' ' फुलांचा झेला, ' ' मधाचें पोळें ' इत्यादि नांवें सहज सुचलीं. पण मूळ सूक्तींचा संग्रह इतकाच बोध त्यावरून होतो— मी तो अर्थ वृत्तबद्ध करून मराठी वाचकांना दिला याचा बोध होत नाहीं—म्हणून मी तीं नांवें बाजूला ठेवलीं. माझी रसिक पुतणी चि. सुलोचना ( आतां सौ. बागदरीकर ) हिनें ' ज्योत्स्ना ' हें नांव सुचविलें. त्यांत पुष्कळच मार्मिकपणा होता. चंद्र हा परप्रकाशित आहे. मूळ इंग्रजी वाङ्मय सूर्याचें मराठी भाषेच्या पृष्ठभागावरून ( महाराष्ट्रदेशाहि चन्द्राच्या पृष्ठभागाप्रमाणें खडकाळ रुक्ष व निर्मळ आहे. ) परावर्तित हें तेज या इतक्या खोल अर्थानें, ज्योत्स्ना हें नांव, नुसतें संकलनच नव्हे तर माझा त्यावरील भाषांतराचा प्रयास या दोन्हींचा समावेश होईल असें होतें यांत शंका नाहीं.

परंतु सूर्यापेक्षां चन्द्राचा प्रकाश, ( सूर्यांचा ताप ज्यांत नाहीं असा ) अधिक शीतल, अधिक रम्य, अधिक सुंदर, अधिक प्रसन्न, अधिक काव्यमय, सुजनांचीं हृदयरूपी कैरविणीकुलें विकसित करणारा, रसिकरूपी चकोरांना अमृतवृष्टीनें तृप्त करणारा, अनंत कवि-तारकांचें तेजोहरण करणारा, इत्यादि चन्द्रप्रकाशाच्या गुणांचे श्लेष त्या नांवांतून निघून मूळ कर्व्यांच्यापेक्षां माझीं भाषांतरेंच अधिक आल्हादकारक असा गर्विष्ठ अभिप्राय मनांत ठेवून मी हें नांव माझ्या या पुस्तकास ठेविलें, असा अहंकारीपणाचा आरोप मजवर येण्याचा संभव लक्षांत घेऊन मी ज्योत्स्ना हेंही नांव बाजूस ठेवलें, कारण माझी पायरी मी ओळखून आहें.

शेवटीं संस्कृत ज्योत्स्नेपेक्षां सरळ मराठी 'पाणपोई' हेंच नांव मला अधिक अन्वर्थक वाटलें. अनंत लेखक व कवि यांच्या सूक्तिरूपी झरे मिळून झालेली इंग्रजी वाङ्मयाची प्रचंड नदी आपल्या अगाध जलौघासह दुथडी भरून वाहात आहे. इंग्रजी शिक्षणरूपी पोहण्याची कला शिकून ज्यांना त्या पात्रांत यथेच्छ अवगाहन करतां येतें, त्यांच्या आनंदाला व तृप्तीला अर्थातच पारावर नाहीं. परंतु महाराष्ट्राच्या रुक्ष, वैराण, उन्हानें करपवून टाकणाऱ्या मार्गावरून चालणाऱ्या तान्हेल्या वाटसरूंना, ( त्या इंग्रजी वाङ्मयनदींत पोहतां न आलें, तरी ) तिचें पाणी मराठी भांड्यांतून पाजण्यासाठीं मीं ही पाणपोई घातली आहे. परंतु ज्या आंग्लभाषानभिज्ञवाटसरूंना मूळ नदीचें स्नान घडत नाहीं व त्यामुळें मूळच्या पाण्याची चव, शीतलता व उत्साह व चैतन्यदायी जिवंतपणा ज्यांना माहीतच नाहीं, त्यांनीं 'मुकेला कोंडा, निजेला धोंडा' या न्यायानें, "तहानेच्या वेळीं कसें कां होईना, पण पाणी तर मिळालें !" असे नाइलाजाच्या समाधानाचे उद्गार काढावे एवढ्यानें माझें समाधान होणारें नाहीं. माझ्या परिश्रमांचें सार्थक्य केवळ एवढेंच असें मी मानीत नाहीं.

माझ्याकडून मीं मूळच्या पाण्याची स्वच्छता कमी होऊन तें गढूळ होऊं नये यासाठीं माझी प्रत्येक घागर अत्यंत काळजीनें घांसूनपुसून स्वच्छ केली आहे. कोणत्याही नदींत किनाऱ्याजवळचें पाणी उथळ व गढूळ असतें म्हणून बहुधा प्रत्येक घागर मीं मुद्दाम स्वच्छ पाणी लागेपर्यंत, नदींत खोलवर जाऊन तेथून भरून घेतली आहे. इतक्या लांबून उन्हांतून प्रत्येक घागर आणतांना पाणी तापून, त्याची मूळ शीतलता व ताजेपणा कमी होऊं नये यासाठीं परमेश्वरानें माझ्या हृदयांत जो अल्पस्वल्प ओलावा दिला आहे तो ओतून त्यांत वस्त्र भिजवून त्यानें प्रत्येक घागर झांकून मीं आणली आहे. छांटवणीची मोडी सुद्धां, मिशनरी भाषान्तर-पद्धतीची परकीय घाटाची सुरई, खुजा, जग् ( Jug ) असलीं न वापरतां शुद्ध संस्कृतोद्भव मराठीच्या मातीच्या रांजणांत तें पाणी छांठविण्याची मीं

काळजी घेतली आहे आणि पिणाऱ्याच्या ओंठापर्यंत पाणी पोंचविण्याचें पन्हळादि आधुनिक, वृत्तहीन, निर्यमक रचनेच्या नोळांनी नव्हाचें न करतां उपमक गणवृत्तांच्या मराठी घेडूच्या सुडौल घांगराचें केलें आहे. तेव्हां मूळ नदींत डुंबूं शकणाऱ्या पट्टीच्या पोहणारांनीं तेथें पोहून परत येतांना या पाणपोईंचें पाणी चाखून "मूळची स्वच्छता, शीतलता ताजेपणा व गोडी, बहुतांश या पात्रांत टिकून राहिली आहे," असें म्हटलें तरच " आ-परितोषाद्विदुषां न साधु मन्ये...... " या कालिदासोक्तीप्रमाणें माझ्या परिश्रमाचें सार्थक झालें असें मला वाटेल. मूळ इंग्रजी सूक्ति व माझें भाषान्तर समोरासमोर ठेवण्यांत मूळाशीं माझें भाषान्तर ताडून पाहतां यावें; मी कशाचें भाषान्तर केलें तें जाणण्यासाठीं मूळ सूक्ति शोधण्याचा त्रास वाचावा व माझ्या भाषान्तरावरून कां होईना जिज्ञासुवृत्ति जागृत होऊन मूळ इंग्रजीकडे वाचकानें वळावें असे तीन प्रधान हेतु आहेत; एरवीं इंग्रजींतल्या अनेक सूक्तिसंग्रहांत आणखी एका संग्रहाची भर पडावी असा हेतु नाहीं.

मूळ ज्या लेखकांचे उद्गार आहेत ते स्वतः मराठी कवि असते, व मी निवडलेल्या वृत्तांत तो आशय त्यांनाच बसवावयास सांगितला असता तर, मी केली अशीच किंवा जवळजवळ अशीच कविता त्यांनीं केली असती असें जर वाचकांना वाटेल तर मी भाषांतराच्या सर्वोच्च परीक्षेंत उतरलों असें मी समजेन.

माझा जन्मभराचा रसायनशास्त्रसंबद्ध व्यवसाय व केवळ रुग्णावस्थेंतली ही कामगिरी या दोन्ही गोष्टी ध्यानांत घेऊन सहानुभूतीनें व दयाबुद्धीनें माझ्या भाषांतराकडे न पाहतां मीं वर सांगितलेल्या कसोटीवरच न्यायनिष्ठुरपणें माझ्या भाषांतराची परीक्षा व्हावी अशी माझी सर्व रसिक व विद्वानांस विनंति आहे.

मूळ सूक्ति, लेखकांच्या ग्रंथांत त्या त्या जागीं ताडून न पाहतां आल्यानें व या भूमिकेच्या प्रथम परिच्छेदांत वर्णिल्याप्रमाणें या या संग्रहाचें स्वरूप संकीर्ण असल्यानें कोठें कोठें मूळ सूक्ति

अनामिक राहिली किंवा चुकून भलत्या लेखकाचें नांव तिला लागलें असें झालें आहे. तसेंच पूर्वापर संबंधविरहित अशी सूक्ति पुढें आल्यानें शकुदर्शनीं वाटला तो अर्थ मीं घेतला ( व तो मूळाच्या बरोबर उलटा आहे; उदा. पान ७२–७३ यांवरील सूक्ति क्रमांक ५ ) असे अनेक दोष यांत राहिले आहेत. ते वाचकांनीं निदर्शनास आणल्यास (पुढील आवृत्तीचा योग आल्यास) दुरुस्त केले जातील.

छपाईंत अशुद्धें प्रमाणाबाहेर राहिलीं यावद्दल, कारणें असलीं, तरी वाचकांची क्षमा मागण्यावांचून मला गत्यंतर नाहीं.

या संग्रहांतील बहुतेक सूक्ति फारच तोकड्या, त्यामुळें आनंद झाला तरी पोट भरल्यासारखें वाटत नाहीं ही अनेक वाचकांनीं केलेली तक्रार खरी आहे. परंतु स्फूर्ति ही विजेप्रमाणें क्षणजीवि असल्यानें उत्तम, खोल, अर्थपूर्ण, सूक्ति या अशा तोकड्याच असावयाच्या. त्यांचें स्वरूप विस्तवाच्या ठिणग्या, शीतल वाऱ्याची झुळूक किंवा अमृताचा बिंदु याप्रमाणें—क्षणभर नेत्रदीपक, सुखावह व तृप्तिदायक इतकेंच असतें. तो कांहीं वणवा नव्हे, किंवा झंझावात नव्हे किंवा क्षीरसागरहि नव्हे. पण असे अल्पकण व बिंदु मिळूनच पृथ्वी व सागर होत नाहींत का ? (पहा–पान १२०–१२१ सूक्ति४)

याचप्रमाणें, " प्रदीर्घ महाकाव्याचें भाषांतर कां करीत नाहीं ?" असेंहि कांहीं स्नेह्यांनीं मला सुचविलें; परंतु महाकाव्यांतील शेंकडा ९०–९५ इतका भाग साधारण नीरसच असतो. पण त्यांत मधून-मधून जीं रत्नें विखुरलेलीं असतात, त्यांनाच माझा जीव भुलला आहे. महाकाव्यें वाचण्याची सहनशक्तीहि आतां कोणांत उरली आहे!

" भाषांतरें फारच सुंदर करतां. आतां स्वतंत्र काव्यें कां करीत नाहीं !" म्हणून सुचविणारे पुष्कळ मित्र आहेत. परंतु तथाकथित स्वतंत्र काव्यें कितपत स्वतंत्र असतात व मीं भाषांतरित केलेल्या सूक्तिरत्नांच्या तुलनेनें त्यांचें मूल्य कितपत असतें, याचा विचार करतां मी करीत आहें हें कार्य फार उपयुक्त आहे असें वाटतें. आतां मराठी भाषेचें स्वतंत्र पुणें विद्यापीठ झालें आहे व इंग्रजी भाषेचें शिक्षण

दिवसेंदिवस कमी कमी होत जाणार, अशा वेळीं, परकीय भाषांतील सर्व सौंदर्यस्थळें व सुविचार आपल्या मराठींत भाषांतरित करण्यानें मराठीचें वैभव वाढविण्यास साह्य होणार आहे व हें कार्य एवढें मोठें आहे कीं, माझ्यासारख्या शेंकडोंजणांचें सारें आयुष्य या कार्यांत वेंचलें तरी तें कार्य पुरें होणार नाहीं.

*१९५० अखेर माझ्यावर इतक्या भयंकर आपत्ति सर्व बाजूंनी* कोसळल्या व त्यांतच हृदयविकारासारख्या घातक रोगाची टांगती तरवार माझ्यावर धरली जाऊन, अशी परिस्थिति आली कीं, चोहों-*बाजूस काळोख भरून प्रकाशाचा किरणहि दिसेनासा झाला. अशा* वेळीं परमेश्वरानें मला हा कवितांचा छंद लावून त्या संकटांतून बाहेर काढलें; याबद्दल त्याचे आभार मानण्यास योग्य शब्दच मजपाशीं *नाहींत. परंतु मनवर आलेल्या प्रसंगांचें तंतोतंत वर्णन मला एका* इंग्रजी कवितेंत सांपडावें हें केवढें आश्चर्य !

पान ६०–६१, सक्ति ९, Joyce Kilmer चे उद्गार पहा—

Because the road was steep & long
And through a dark and lonely land,
God set upon my lips a song—
And put a lantern in my hand !

" उत्पत्स्यतेऽस्ति मम कोपि समानधर्मा—कालो ह्ययं निरवधि-विपुला च पृथ्वी ॥" हे भवभूतीचे शब्द कसे सार्थ आहेत !

*असो; माझी ही पहिलीच वाङ्मयीन कृति मराठी रसिकांपुढें* ठेवीत आहें. ती त्यांना मान्य झाली तर परिश्रमाचें सार्थक वाटून " क्लेशः फलेन हि पुनर्नवतां विधत्ते ।" या कव्युक्तीप्रमाणें हाच *प्रयत्न पुढें चालविण्यास मला हुरूप येईल.*

ज्या सन्मित्रांनीं सूक्ति जमविण्यास साह्य केलें व माझ्या प्रयत्नास उत्तेजन दिलें त्यांचे आभार मानणें म्हणजे माझे स्वतःचेच आभार *मानण्यासारखें असल्यानें मी ते मानीत नाहीं.*

८२ खटाव बिल्डिंग,
लालबाग, मुंबई नं. १२ } लक्ष्मण गोविंद विंझे

# अर्पणपत्रिका



माझे परमपूज्य वडील— कै. ती. गोविंद जनार्दन विंझे

व

मातुश्री— कै. ती. सौ. लक्ष्मीबाई विंझे

यांचे चरणीं

माझी ही पहिली वाङ्मयकृति सप्रेम सादर समर्पण.



कै. ती गोविंद जनार्दन विंझे



कै. सौ. लक्ष्मीबाई विंझे

स्रग्धरा

आई ! दादा ! तुम्हांला कुतुक शिशुपणीं फार या लक्ष्मणाचें
थोडी थोडी तयाची स्मृति मनिं धरुनी स्वर्गिं गेलां सदाचे ॥
त्रासोनी संकटांनीं, कण्हत, मम मुखें बोल जे बोलवीले
वेडे वा वाकुडे ते, प्रभुसम तुमच्या सत्पदीं अर्पियेले ॥



दिवसेंदिवस कमी कमी होत जाणार, अशा वेळीं, परकीय भाषांतील सर्व सौंदर्यस्थळें व सुविचार आपल्या मराठीत भाषांतरित करण्यानें मराठीचें वैभव वाढविण्यास साह्य होणार आहे व हें कार्य एवढें मोठें आहे कीं, माझ्यासारख्या शेकडोंजणांचें सारें आयुष्य या कार्यात वेचलें तरी तें कार्य पुरें होणार नाहीं.

१९५० अखेर माझ्यावर इतक्या भयंकर आपत्ति सर्व बाजूंनीं कोसळल्या व त्यांतच हृदयविकारासारख्या घातक रोगाची टांगती तरवार माझ्यावर धरली जाऊन, अशी परिस्थिति आली कीं, चोहों-बाजूंस काळोख भरून प्रकाशाचा किरणहि दिसेनासा झाला. अशा वेळीं परमेश्वरानें मला हा कवितांचा छंद लावून त्या संकटांतून बाहेर काढलें; याबद्दल त्याचे आभार मानण्यास योग्य शब्दच मजपाशीं नाहींत. परंतु मजवर आलेल्या प्रसंगाचें तंतोतंत वर्णन मला एका इंग्रजी कवितेंत सांपडावें हें केवढें आश्चर्य !

पान ६०–६१, सूक्ति १, *Joyce Kilmer* चे उद्गार पहा—

Because the road was steep & long
And through a dark and lonely land,
God set upon my lips a song—
And put a lantern in my hand !

" उत्पत्स्यतेऽस्ति मम कोपि समानधर्मा—कालो ह्ययं निरवधि-र्विपुला च पृथ्वी ॥" हे *भवभूतीचे शब्द कसे सार्थ आहेत !*

असो; माझी ही पहिलीच वाङ्मयीन कृति मराठी रसिकांपुढें ठेवीत आहे. ती त्यांना मान्य झाली तर परिश्रमांचें सार्थक वाटून " क्लेशः फलेन हि पुनर्नवतां विधत्ते । " या कव्युक्तीप्रमाणें हाच प्रयत्न पुढें चालविण्यास मला हुरूप येईल.

ज्या सन्मित्रांनी सूक्ति जमविण्यास साह्य केलें व माझ्या प्रयत्नास उत्तेजन दिलें त्यांचे आभार मानणें म्हणजे माझे स्वतःचेच आभार मानण्यासारखें असल्यानें मी ते मानीत नाहीं.

८२ खटाव बिल्डिंग,
लालबाग, मुंबई नं. १२

लक्ष्मण गोविंद विंझे

## (1) Life, world, man.

(1) *(Richard Henry Wilde)*

My life is like the summer rose,
That opens to the morning sky,
But ere the shades of evening close,
Is scattered on the ground to die. (1)

Yet on the rose's humble bed,
The sweetest dews of night are shed,
As if she wept the waste to see—
But none shall weep a tear for me! (2)

My life is like the winter leaf,
That trembles in the moon's pale ray.
It's hold is frail,—it's date is brief,
Restless—and soon to pass away. (3)

Yet ere that leaf shall fall and fade,
The parent tree will mourn it's shade,
The winds bewail the leafless tree,
But none shall breathe a sigh for me! (4)

My life is like the prints which feet
Have left on Tampa's desert strand;
Soon as the rising tide shall beat,
All trace will vanish from the sand. (5)

Yet as if grieving to efface,
All vestige of the human race,
On that lone shore loud moans the sea,
But none, alas! shall mourn for me! (6)

## (१) जीवन, जग, मनुष्य.

### (१) (शिखरिणी)

उन्हाळ्यामध्यें जें सुमधुर उषःकालि विकसे ।
गुलाबाऐसें त्या, क्षणिक मम हें जीवन दिसे ॥
जसें संध्याच्छाया पसरति तयापूर्वीच क्षणीं ।
पडे पिरकारोनी धरणिवरती — जाय मरुनी ॥ १ ॥

गुलाबाखालीं त्या तिय निवळ मातींतहि परी ।
पहा रात्रीदेवी मधुर देवबिंदूंस वितरी ॥
रडे, वाटे, ती या अतिकरुण नाशास बघुनी ।
कुणालाही माझ्यास्तव, परि न ये अश्रु नयनीं ॥ २ ॥

जणूं हें जीवाचें, शिशिरऋतुचें पान पिकलें ।
जसें तें चंद्राच्या पुसट किरणांतीं थरथरे ॥
तसें क्षीणाधारें, क्षणभरचि आयुष्य उरलें ।
"क्षणीं आतां जाणें" म्हणुनि बहु अस्वस्थ बनलें ॥ ३ ॥

अशाही पर्णाच्या पतननशनापूर्वीच परी ।
रडे "छाया गेली" म्हणुनिच पिता पादप तरी ॥
अपर्णा त्या वृक्षास्तव पवन हो विव्हल मनीं ।
न निःश्वासा टाकी परि जगति माझ्यास्तव कुणी ॥ ४ ॥

ठसावीं पाऊलें पुलिनमय त्या भूमिवरतीं ।
मला वाटे त्यांच्यासमचि मम ही जीवनगति ॥
क्षणीं येती लाटा भरति चढतां ज्या उसळुनी ।
क्षणीं त्या टाकीती सकल पदचिन्हांस पुसुनी ॥ ५ ॥

परी त्या कृत्यानें सदयचि मनीं अब्धि बनुनी ।
"घडे मानव्याचें विनशन न हें योग्य" म्हणुनी ॥
किनारीं एकांतीं उदधिहि रडे शोक करुनी ।
अरेरे ! शोकातें करि न परि माझ्यास्तव कुणी ॥ ६ ॥

(2) *(Oharles Kingslay)*

For men must work, and women must weep,
And there is little to earn and many to keep,
The sooner it is over, the sooner to Sleep,
And good-bye to the world and its moaning.

(3) *(Ella Wheeler Wilcox)* "Solitude"

Laugh ! and the world laughs with you !
Weep ! and you weep alone !
For, the sad old earth must borrow its mirth
But has trouble enough of its own.

(4) *(Longfellow)*

*Our ingress* into the world—
was naked and bare ;
*Our progress* through the world—
is trouble and care.
*Our egress* from the world will be,
nobody knows where,
But if we do well *here*, we shall do well *there*.

(5) *(Thomas Hood)*

O God ! that bread should be so dear
And flesh and blood so cheap !

(6) *(Old Testament)*

One generation passeth away and another generation commeth, but the earth abideth for ever.

(२) (सुमंदारमाला)

'सदा कष्टणें' हें कपाळीं नरांच्या; स्त्रियांच्या कपाळीं सदा रोदन।
मिळे अल्प; खाण्या मुखें फार; हाची सदा प्रश्न कीं 'घालुं या कोठुन?'॥
घडो शीघ्रची अंत या जीवनाचा; सदाची मिळो सौख्यनिद्रा क्षणीं।
जगांतील दुःखांस कष्टांस सार्‍या 'नमस्ते' म्हणूं या मनीं हर्षुनी॥

(३) (फटका)

हंसा हंसा हो! तुमच्यासंगें हंसेलची हें जग सारें।
रडाल तुम्ही परी एकले—कुणी न संगें रडणारें॥
हंसणें उसनें घ्यावें लागे दुःखी कष्टी जगतास।
अनंत दुःखें परि हो त्याचीं पुरुनी उरतीलचि त्यास॥

(४) (आर्या)

**आलों जगिं या** आपण उघडे तैसेच नागडे सारे।
करतां **प्रवास** यांतुन आपत्तींचेच झोंबलें वारें॥
**जाणें इथुनी** कोठें ठाउक नाहीं कुणासही; येथें।
सत्कार्यों जे करिती त्याचा सत्कारची घडे तेथें॥

(५) (वसंततिलका)

देवा! कसें अहह! अन्न महाग केलें।
हें मांस रक्त परि स्वस्त किती जहालें॥

(६) (फटका)

एक जाउनी दुसरी येई पिढी, परी जग चिरंतन।

(7) *(P. L. Dunbar)*

A crust of bread, and a corner to sleep in,
A minute to smile and an hour to weep in,
A pint of joy to a peck of trouble—
And never a laugh,
but the moans come double!

(8) *(Oscar Wilde)*

He who lives more lives than one, more deaths than one must die!

(9) *(Shakespeare)*

There is a tide in the affairs of men,
Which when taken at the flood,
leads on to the fortune.

(10) *(Pope)*

On life's vast ocean, diversely we sail,
Reason the guide, but Passion the gale.

(11) *(Shakespeare)*

The patient dies, while the physician sleeps;
The orphan pines, while the oppressor feeds;
Justice is feasting, while the widow weeps;
Avarice is sporting, while infection breeds.

(12)

Half the world does not know,
what the other half is doing.

(13)

Life is like a dome of many coloured glass,
Staining the white radiance of Eternity.

(७) (भुजंगप्रयात)

मिळे ती शिळी भाकरी खावयाला। कुठे कोपरा एक झोंपावयाला॥
क्षणाचाच हो वेळ लाभे स्मिताला। घडी एक संपूर्णची रोदनाला॥
मिळे एक तोळ्याभराचेंच सूख। परी खंडि खंडी भरोनीच दुःख॥
जगीं खद्‌खदोनी कधीं ना हंसावें। दुहेरी परी तीव्रतेनें कण्हावें॥

(८) (पृथ्वी)

अनेकविध भूमिका वरितसे जगीं जो नर।
अनेकविध मृत्युही पडति येउनी त्यावर॥

(९) (फटका)

भरति ओहटी जीवनसागरिं नित्य; संधि साधुनी परी।
करती स्वारी, भरतीवरती, भाग्यलक्ष्मि त्यांतेंच वरी॥

(१०) (फटका)

अफाट जीवनसागरि नेतों उलटसुलट नौ कुठें तरी।
विवेक वाटे मार्गदर्शिका—विकार परि वादळापरी॥

(११) (पृथ्वी)

इथें मरत रुग्ण, निद्रित सुखें तिथें वैद्य तो।
भुका शिशु अनाथ, पीडक पहा सुखें जेवतो॥
रडोत विधवादि, न्यायगृहिं मेजवानी पहा॥
असेच अतिलोम तेथ, पसरे जिथें रोग हा॥

(१२) (शार्दूलविक्रीडित)

जाणींना जगदर्ध अर्ध दुसरें कैसें जगे हें कधीं॥

(१३) (शा. वि.)

काचेचा बहुरंगिसा घुमटची हें मानवी जीवन।
सारें शुभ्र चिरंतनत्वाचि तयें जाई सदा रंगुन॥

(14) (*Shakespeare*)

Life is as tedious as a twice told tale,
Vexing the dull ear of a drowsy man.

(15)

A perilous life and sad as life may be,
Hath the lone fisher, on the lonely sea,
Over the wild waters labouring far from home,
For some bleak pittance ever compelled to roam.
Few hearts to cheer him through his dangerous life,
And none to aid him in his stormy strife,
Companion of sea and silent air,
The lonely fisher thus must ever fare.
Without comfort, hope-with scarce a friend,
He looks through life and only sees its end.

(16) *Mrs. Barbauld*

Life ! I know not what thou art,
But know that thou and I must part,
And when, or how, or where we met,
I own, to me is a secret yet.
Life ! we have been long together,
Through pleasant and through cloudy weather !
Perhaps it will cost a sigh or tear;
—Then steal away-give little warning,
Choose thine own time;
Say not "Good night"— but in some brighter clime,
Bid me "Good morning !"

(१४) (शा. वि.)

झोंपाळू नर घे द्विरुक्त नि घिळी वार्ता जशी ऐकुन—।
कंटाळून चिडून ; तोंवि सगळें हें भासतें जीवन ॥

(१५) कोळ्याचें कष्टी जीवन (शा. वि.)

धोक्याचें, परिपूर्ण–दुःखमयचीं त्या धीवरालागुन ।
एकाकी उदधीवरी मिळतसे एकान्त हें जीवन ॥
कष्टे दूर घराहुनीं, उदधिच्या प्रक्षुब्ध लाटांवर ।
नित्याचें फिरणें कपाळिंच, घड्या बांधून पोटावर ॥ १ ॥

एखादा कुणि, संकटात हृदया द्याया समाश्वासना ।
क्षुब्धाब्धीवर वादळीं झगडतां, साह्यार्थ कोणीच ना ॥
नित्याचा सहकारि सागर, तसा निःशब्द वायू खरा ।
एकाकी असलें जिणेंच नशिबीं येई पहा धीवरा ॥ २ ॥

आशा सौख्य नसेच ; ज्यास कुणिही सन्मित्र ना लाभला ।
संसारांतुन आरपार बघतां–ये अंतची दृष्टिला ॥

(१६) "जीवनाची ताटातूट" (शा. वि.)

नाहीं आकळलें स्वरूपहि तुझें हे जीविता ! काय तें ।
ताटातूट परी अवश्य अपुली ही निश्चितीं वाटते ॥
झालें मीलन आपुलें प्रथम तें केव्हां कुठें वा कसें ? ।
आहे गूढचि हें मला अजुनिही, हें मान्य मातें असे ॥ १ ॥
मित्रा ! त्वत्सहकार्य गोड मजला जन्मावधी लाभलें ।
येतां दुर्दिन वा तसे सुदिनही नाहींच जें भंगलें ॥
आतां हा घडतां वियोग हृदयीं निःश्वास वा अश्रु ये ।
जाण्यापूर्वि म्हणून सूचन मला कांहींच देऊं नये ॥ २ ॥
जाई वा ठरवूनि वेळ अपुला तूं चोरट्या पाउलीं ।
घेऊं या न निरोप आपण परी ही आस रे लागली—
कीं–येतां अनुकूल काल पुढती याहून केव्हां तरी ।
दे भेटून मला तदा पुनरपी सुस्वागतातें करी ॥ ३ ॥

(17) *Southey*

Man hath a weary pilgrimage,
As through the world he wends,
On every stage from youth to age,
Still discontent attends;
  With heavyness he casts his eye
  Upon the road before;
  And still remembers with a sigh,
  The *days that are no more.*

(18) *Sir Thomas Browne*

This world which took but six days to *make*,
Is likely to take six thousand to *make out* !

(19) *Thomas Hood*

  This horrible world–it is a vast wilderness,
  Where tears drop from every tree.

(20) *Chaucer*

The world is but a thoroughfare full of woe,
And we but pilgrims passing to and fro,
Oh ! Death is an end of every worldly sore.

(21) *Horace Walpole*

  This world is a comedy to those who think,
  A tragedy to those who feel !

(22) *Shakespeare*

All the world's a stage,
And all the men and women merely players,
They have their exits and their entrances,
And one man in his time plays many parts.

(१७) (वसंततिलका)

आहे खराच बहु कष्टद हा प्रवास ।
जाई जगामधुनि काढित वाट त्यास ॥
मुक्काम यौवनिं, जरेंत, कुठेंहि व्हावा ।
त्यातें अतृप्ति–सहवास सदा घडावा ॥ १ ॥
मारावल्या नयनिं हा पुढतींच पाहे ।
वाटे सुदीर्घ अजुनी किति वाट राहे ॥
निःश्वास टाकित परी; मनिं आठवीतां –।
कीं "काय गोड गतजीवनकाळ होता!" ॥ २ ॥

(१८) (पृथ्वी)

सहाच दिवसांत हें जग रची जरी तो विधि ।
न अब्द पुरती, तया समजण्या, सहस्रावधि ॥

(१९) (स्रग्धरा)

वाटे सान्या जगाचें भयकर अवघें रान हें घोर साचें ।
वृक्षांवृक्षांवरोनी टपटप गळती अश्रु जेथें सदाचे ॥

(२०) (वसंततिलका)

हा राजमार्गचि जणूं जग; जेथ मारी ।
दुःखें पदोपदिंच भेटति प्राणहारी ॥
यात्रेकरूच जणुं आपण येत जात ।
मृत्यूंतची सकल ऐहिक दुःख-अंत ॥

(२१) (व. ति.)

त्यांतें विवेक, जग त्यांस असे सुखान्त ।
शोकान्त त्यां, रहति जे मृदु भावनांत ॥

(२२) (व. ति.)

ही रंगभूमि गमते सगळ्या जगाची ।
जें जें करी मनुज–केवळ भूमिकाची ॥
येथें 'प्रवेश' 'गमनें' जशि नाटकांत ।
कामें करी नर बहुविध भूमिकांत ॥

(23) *Longfellow*

Thus at the flaming forge of life,
Our fortune must be wrought!
Thus on its sounding anvil shaped,
Each burning deed and thought.

(24)

—Life is the isthmus between two eternities.

(25) *Old testament*

Naked came I out of my mother's womb
And naked shall I return thither.

(26) *Mark Twain*

Why is it that we rejoice at a birth and grieve at a funeral? Is it because, we are not the person concerned?

(27) *C. T. Coleridge*

To meet, to know, to love, and then to part
Is the sad tale of many a human heart.

(28) *William Drummond*

*(Strange ends we toil for in life!)*

A good that never satisfies the mind;
A beauty fading like the April flowers;
A sweet, with floods of gall, that runs combined!
A pleasure, passing ere in thought made ours;
An honour that's more fickle than wind;
A glory at opinions frown, that lowers;
A treasury that bankrupt time devours;
A knowledge than grave ignorance more blind;

(२३) (शा. वि.)

मद्दी जीवनरूप ही धगधगे; ज्वालांत या टाकुनी।
स्वेच्छेनें घडवूं नवीनच अशी सन्मूर्ति दैवांतुनी॥
ठोकोनी तिथ ऐरणीवरति त्या संतप्त लोहापरी।
कल्पें, तप्त विचार, यांसहि नवा आकार देऊं करीं॥

(२४) (उपजाति)

द्विखंड भू दोन चिरंतनांची। संयोगभूमी तिथ जीवनाची॥

(२५) (भु. प्र.)

जसा मातृगर्भांतुनी नग्न येतों।
तसा नग्नची अन्य लोकास जातों॥

(२६) (फटका)

जन्मानें आनंद, मृत्युनें दुःख, आपणां कां होतें?
जन्ममृत्यु तो नसे स्वतांचा म्हणुनिच का हो हें वाटे?

(२७) (स्रग्धरा)

येणें एकत्र; होणें परिचित; करणें प्रेम; — जाणें त्यजोनी।
ऐशी सार्‍या नरांची अहह! दिसतसे शोकपूर्णा कहाणी॥

(२८) (सुमंदारमाला)

स्वताच्या मना जें कधीं तोषवीना (जगावेगळेंची) असें धेय तें।
उन्हाळी फुलांच्यापरी अल्पजीवी अशी चारुताही हवी वाटते॥ १॥

विषाच्या पुराच्यासवें वाहणारा मधाचा जणूं अल्पसा पाझर।
धरावा मनानें तयापूर्वि जावा विरोनी, असा मोद तो चंचल॥ २॥

वसे जींत चापल्य वायूहुनीही अशी ती जणूं काय सन्मान्यता।
अशी कीर्ति, कीं म्लान होई, फुटाळी जिला अल्प रागाहुनी पाहतां॥३॥

भिकारी सदा रिक्त तो काल ज्यातें घसे खात ऐसें धनागार तें।
नसे जेवढें घोर अज्ञानही अंध; त्याहूनही आंधळें ज्ञान तें॥ ४॥

A vain delight our equals to command ;
A style of greatness in effect a dream
A swelling thought of holding sea and land
A servile lot decked with a pompous name—
Are the strange ends we toil for, here, below
Till wisest Death makes us our errors know.

( 29 ) *Cowly*

A man is near all kinds of beasts,
A fawning dog— a roaring lion,
A thieving fox—a robbing wolf,
A dissembling crocodile-a rapacious vulture,
and a treacherous decoy.

( 30 ) *Talmud*

Life is mostly froth and bubble
Two things stand like stone !
Kindness in another's trouble
Courage in our own !

( 31 ) *Channing*

No man is so tall that he need never stretch,
Nor so small that he need never stoop !

( 32 ) *George Eliot*

What do we live for, if not to make—
The world less difficult for all of us ?

( 33) *Ruskin*

One who does not know when to die,
Does not know how to live !

( 34 ) *M. B. Eddy*

Lulled by stupefying illusions, the world
is sleeping in the cradle of infancy !

समानांवरी गाजवावी स्वसत्ता अशी गर्वयुक्ता जणू होस ती ।
वदे नांव खोटेंच, मोठेपणाचें परी वस्तुतां स्वप्नरूपींच ती ॥ ५ ॥
समुद्रासवें भूमिचें ईश व्हावें अशी ऊर्मि किंवा मनोराज्य तें ।
पिसारे शिरीं लावुनी ऐट दावो–परी दास्यतेचें जिणें सत्य तें ॥ ६ ॥
असे व्यर्थ हेतू विचित्रापरींचे धरोनीच आम्ही जगीं कष्टतों ।
चुका दाखवीतों परी अंतिं आम्हांस, सर्वांच ज्ञानी असा मृत्यु तो ॥ ७ ॥

( २९ ) वसंततिलका

कुत्र्यापरी करित अंगुलचालनातें । सिंहापरी करितसे कधिं गर्जनेतें ॥
कोल्ह्यापरी हळुंच चौर्य कधीं करीतो । येई लुबाडुनि पळें जणुं लांडगा तो ॥
नक्राश्रुनें प्रकटवी कधि नम्रता तो । खादाडही कधि गिधाडसमान होतो ॥
ध्यानस्थ होउनि वधी बगळ्यासमान । आहे असा मनुज सर्व पशूंसमान ॥

( ३० ) ( शा. वि. )

आहे जीवन बुद्बुदासम, तसें बहुश फेनापरी ।
होती दोनचि वस्तु सुस्थिर अशा मेरूपरी भूवरी ॥
ठेवावी उपकारवृत्ति, जधिं ये आपत्ति लोकांवरी
ठेवावी धृतिही, विपत्ति घुसुनी येतां स्वताचे घरीं ॥

( ३१ ) ( वसंततिलका )

कोणी न उंच इतुका जगिं ये दिसून । कीं ज्या कधीं करहि लांबविणें पडे न ॥
किंवा न वामन कुणी इतुका लहान । कीं ज्या न मान कधिं वांकविणें हि मान ॥

( ३२ ) ( शा. वि. )

आहे याहुनि अल्प कष्टद असो सर्वांस हें जीवन
यावांचून तुज्या कशास जगतों सारे जगीं आपण ?

( ३३ ) ( भु. प्र. )

मरावें कधीं हें न जाणे, तयाला । जगावें कसें हाहि ना बोध झाला ॥

( ३४ ) ( शा. वि. )

हस्थें भ्रांत, पहात, मूढकरणीं, गुंगूल त्यांच्यामुळें
बाल्यावस्थचि, पाळण्यांत, जग हें, वाटे असें झोंपलें ॥

( १६ ) ( शा. वि. )

स्त्रीची संगत, रूप, नाजुकपणा, उल्हासही दुस्तर ।
हें सर्व मज आवडे बहुपरी—ती गप्प राहे तर ॥

---

## स्फूर्तिकारक

( १ ) ( शार्दूलविक्रीडित )

शोकाच्या रडच्या सुरांत मजला सांगूं नका हें असें— ।
" आहे जीवन मानवी सकल हें निःसारसा स्वप्नसें " ॥
आत्मा तो मृतची; न जागृत असे जो जीवनीं या जरी ।
वस्तू या दिसती जशा वरुनि, ना तैशाच त्या अंतरीं ॥१॥

आहे जीवन सत्य; यांत न कुठें आभासही तो असे ।
" जावा देह स्मशानि " हेंच इतुकें हो ध्येय त्याचें नसे ॥
" मातीं तूं असशी, पुन्हां मिसळशी मातींत त्या जाउनी " ।
नाहीं शब्द असे कुणीच वदले आत्म्यास उद्देशुनी ॥२॥

भोगावी सुखसंपदा सतत वा तें दुःख या जीवनीं ।
ऐसें ध्येय न मार्ग वा नियतिनें कोणा दिला नेमुनी ॥
हाची धर्म—अखंड कर्म करुनी टाकूंच थोडें तरी ।
जो गेला दिन त्यापुढें, प्रगतिच्या पाऊल मार्गावरी ॥३॥

आहे जीवन धावतें नि सगळ्या त्या कष्टसाध्या कला ।
( हें ऐकूनचि ) धीर वीर हृदयीं धारा मिळे भीतिला ॥
त्याचें स्पंदन दद नादचि मृदंगीचा जणूं भासती ।
प्रेताच्यासम मानवा मिरवुनी नेती स्मशानाप्रती ॥४॥

In the world's broad field of battle,
In the bivouac of life,
Be not like dumb driven cattle,
Be a hero in the strife.

Trust no future however pleasent,
Let the dead past bury its' dead,
Act ! act ! in the living present,
Heart within and God overhead.

Lives of great men all remind us,
We can make our lives sublime,
And departing, leave behind us,
Footprints on the sands of time.

*Footprints*—that perhaps another—
Sailing on life's solemn main,
A forlorn shipwrecked brother,
Seeing, shall take heart again.

Let us, then, be up and doing,
With a heart for any fate;
Still achieving, still pursuing,
Learn to labour and to wait.

( 2 ) *Ellen Sturgis Hooper*

" Beauty and Duty "

I slept and dreamt, that life was beauty,
I awoke and found, that life was duty !
Was my dream then shadowy lie ?
Toil on, sad heart ! courageously,

पृथ्वीच्या जणुं या रणांगणपरी विस्तीर्णशा भूवरीं ।
थाटे जीवनरूप छावणिच ही; सर्वत्र येथें; परी– ॥
'कोणीही इकलावि' मूक असलीं होऊं नका हो गुरें ।
युद्धामाजि पराक्रमा करित जे, व्हा शूर ऐसे खरे ॥५॥

भासे रम्य भविष्यकाळ परि ना विश्वास त्याचा धरीं ।
मेलेला गतकाळ भूत अपुलें गाडून टाको तरी ॥
या प्रत्यक्षचि वर्तमानसमयीं कार्यप्रकर्षा करीं ।
साक्षी या हृदयास ठेवुनि, तसें देवास सर्वोपरी ॥६॥

थोरांचीं अवघीं विशुद्ध चरितें देतीं महामंत्र हा–– ।
"माझें जीवनही उदात्त करणें, हें शक्य मातें" पहा ॥
जातांना इथुनी, निजस्मरण हो, राहील ज्याच्यामुळें ।
काळाच्या पुलिनावरी उठवुं या हीं आपलीं पाउलें ॥७॥

नौका जीवनसागरीं ढकलुनी जातां प्रवासी कुणी ।
दुर्दैवें हतभाग्य येथ पडतां नौकाहि ती भंगुनी ॥
काळाच्या पुलिनीं चुकून दिसतां तीं पाउलें या जना ।
नैराश्यांत कदापि देतिल अशा जीवा समाश्वासना ॥८॥

तेव्हां आपण सर्वही उठुनिया कार्यास लागूं चला ।
सोडूं धैर्य नच प्रसंग जरि ये वाईट वा चांगला ॥
साधे अल्प तरी, तसेच झगडूं संपूर्ण ध्येयास्तव
"कष्टावें–परि ना अधीर बनणें" हा पाठ घेऊं नव ॥९॥

## (२) (फटका)

## सौंदर्य आणि कर्तव्य

"मेलों झोपीं–स्वप्निं पाहिलें–जीवन सुंदर हें सारें ।
जागा झालों–समजुनि आलें–जीवन हें कर्तव्य खरें ॥१॥
होतें कां हो असत्य माझें स्वप्नहि तें सावलीपरी ?" ।
"दुःखी हृदया! धीर धरोनी, असेंच पुढती कष्ट करीं ॥२॥

And thou shall find thy dream shall be,
A noonday light and truth to thee.

( 3 ) ( *Emily Dikinson* )

If I can stop one heart from breaking,
I shall not live invain.
If I can ease one life the aching,
or cool one pain,
Or help one fainting robin,
Unto his nest again,
I shall not have lived invain.

( 4 ) ( *G. L. Banks* )

I live for those who love me—
—for those who know me true,
For the heaven that smiles above me—
—and awaits my spirit too;
For the cause that lacks assistance,
for the wrong that needs resistance,
For the future in the distance,
—and the good that I can do.

( 5 ) ( *Berton Barley* )

With doubt and dismay you are smitten,
You think, there is no chance *for you, son?*
Why, the best of books have not
been written,
The best race has not been run.

( 6 ) ( *Tennyson* )

Ring out the old,
Ring in the new;

दिसुनी येईल तुलाच मग कीं, नव्हतें स्वप्न तुझें खोटें ।
नव्हती छाया ! मध्यान्हींचा प्रकाश जीवनभर दाटे" ॥३॥

( ३ ) ( फटका )

हृदयभंग जरि एकाचाही अटकावूं मी जगिं शकलों ।
तरी मानवी देह घेउनी व्यर्थ न मी जन्मा आलों ॥ १ ॥
सुखहता जरि आणूं शकलों एकाच्याही दुःखास ।
शीतलता वा देऊं शकलों तीव्र वेदना हो ज्यास ॥ २ ॥
मूर्च्छाहत पांखरा ठेविलें पुनरपि त्याच्या घरट्यांत ।
तरीहि वाटे या देहाचें सार्थक झालें जन्मांत ॥ ३ ॥

( ४ ) ( चाल—केशवकरणी )

करि जो मजवरि प्रेम—असे ज्या पारख माझी खरी—।
जीव मी त्यांचेसाठीं धरीं ॥ १ ॥
पाहत माझी वाट स्वर्गं जो—स्मित वरुनी करितसे ।
तयाच्यासाठीं मी जगतसें ॥ २ ॥
साह्य सुकार्या, अन्यायाला विरोधची करण्याला, ।
असें मी जीव पहा जगविला ॥ ३ ॥
दूर भविष्यांत वा करुं शके मी आजहि जें भलें ।
प्राण हे त्याचेस्तव राहिले ॥ ४ ॥

( ५ ) ( चाल—गौरतनु जानकी )

भीति आश्चर्य हीं हृदय तव मासुनी, येई कां मानसीं हीच शंका ?—१
कीं जगीं मोठिशी करुनि कृति दावण्या, तुरलि संधी तुला वाटतें का ? २
संधि घे ही तुला—जगतिं सर्वोत्तम— ग्रंथ बाकी असे अजुनि लिहिणें ? ३
व्हावयाची अजुनि श्रेष्ठ ती शर्यत, तेच चपलता तुझी प्रकट करणें ४

( ६ ) ( शार्दूलविक्रीडित )

घंटानादभरें विसर्जित करा जें जीर्ण झालें तया ।
हें आवाहनची असो उगवत्या वर्षास्तही यावया ॥

Ring out the false,
Ring in the true !

(7) (*Arthur Hugh Clough*)

Say not " The struggle naught availeth,
The labour and the wounds are vain,
The enemy fainteth not, nor faileth,
And as things have been, they remain. "
If hopes were dupes, fears may be liars,
It may be, in yon smoke concealed,
Your comrades chase even now the fliers,
And but for you possess the field.
For while the tired waves vainly breaking,
Seen here no painful inch to gain,
Far back through creeks and
inlets making,
Comes silent, flooding in, the main.
And not by eastern windows only,
When daylight comes, comes in the light
In front the sun climbs slow, how slowly !
But westward, look, the land is bright !

(8) (*Longfellow*)

Village Blacksmith

Each morning sees a task begun,
Each evening sees its close,
Something attempted,—something done,
Earns a night's repose !

" मेलें सर्व असत्य !" घोषित करा घंटानिनादें असें ।
सत्या स्वागतही सुभव्य घडुं द्या घंटानिनादें तसें ॥

( ७ ) ( शार्दूलविक्रीडित )

" जो केला बहुकाल घोर झगडा, तो व्यर्थ सारा दिसे ।
झालेले व्रण, कष्ट फोल ठरले " बोलूं नका हें असें ॥
" नाहीं मूर्च्छित शत्रु तो; न अथवा युद्धांत मागें सरे ।
होती तैशिच ती परिस्थिति असे " मानूं नका हें खरें ॥१॥

आशा ही फसवी तरी भय कधीं खोटेंच तें बोलतें ।
ऐशीही स्थिति का नसेल !-तिथ त्या धूमाविया खालितें–॥
धांवे शत्रु नि पाठलाग करितो सायी तुझे मागुनी ।
घेती जिंकुनि भूमि सर्व तिथली, एका तुह्यावांचूनि ॥२॥

वाटे, व्यर्थ थकून जाति फुटुनी लाटा किनाऱ्यावरी ।
कष्टें एक तसूंहि या शकति ना जाण्या पुढें ही जरी ॥
मागें दूर कुठें निरुंद असल्या खाडीमधूनि पुढें ।
दृष्टीआड हळूहळू भरतिची ती लाट मोठी चढे ॥ ३ ॥

जातां अंधुकशी पहांट सरुनी तो सूर्य येतां वरी ।
पूर्वेची खिडकीच एक कधिं कां आणी प्रकाशा घरीं ॥
सामोरा रवि ये वरी, परि किती ती अल्प त्याची गती ।
झाली उज्ज्वल पश्चिमेकडिल ही भूमी पहा ती किती ॥४॥

( ८ ) ( शार्दूलविक्रीडित )

खेडूत लोहार

प्रातःकालिं नव्याच नित्य मनुजें कार्यास आरंभणें ।
झाला जों न दिनांत तोंवरिच तत्साफल्यही पाहणें ॥
अल्पोपक्रम–अल्पसिद्धि मनुजा ही नित्य लाभे जरी ।
घ्याया झोंप सुखेंचि रात्रभरची ये पात्रता त्या खरी ॥

(9) (*Philips Brooks*)

Do not pray for easy living,
pray to be stronger men.
Do not pray for tasks equal to
your strength,
Pray for strength equal to your task.

(10) (*Montgomery*)

Higher, higher will we climb,
Up the mount of glory,
That our names may live through time,
In our country's story.
Happy, when her welfare calls,
He who conquers, he who falls.

Deeper deeper let us toil,
In the mines of knowledge,
Nature's wealth and learnings spoil,
Win from school and college;
Delve we these for richer gems,
Than the stars of diadems.

Onward, onward, may be pass,
Through the path of Duty,
Virtue is true happyness,
Excellance true beauty.
Minds are of celestial birth,
Make we then, a heaven of earth.

( ९ ) ( उपजाति )

प्रार्थू नको स्वास्थ्य मिळावयातें। प्रार्थी बलीयान् नर व्हावयातें ॥
निजाल्पशक्तीसचि पेलणारें । मागूं नको क्षुद्रचि कार्य तूं रे ॥
कर्तव्य येवो तुज कष्टदायी । तत्तुल्य पे मागुनि शक्ति तूंही ॥

( १० ) ( वसंततिलका )

जाऊं चढून अधिकाधिक उंच उंच ।
सत्कीर्तिच्या परमउच्च गिरीवरीच ॥
टाको न काळ पुसुनी मम कीर्तिजात ।
राहो स्वदेश-इतिहास-सुपुस्तकांत ॥
युद्धार्थ भूजननिची जधिं हांक येत ।
जिंके, मरे, उभयहि तिथ धन्य होत ॥ १ ॥

जाऊं खणीत अधिकाधिक खोल खोल ।
ज्ञानाचिया अति अगाध खनींत दूर ॥
नैसर्ग वित्त; लयलूटहि शिक्षणाची ।
विद्यालयांतुनहि आपण घेउं साची ॥
येथीं तिथून खणुं उज्वल थोर रत्नें ।
कीं लाभतीं न मुकुटासहि ज्या प्रयत्नें ॥ २ ॥

जाऊं पुढें सततही पुढतीच जाऊं ।
कर्तव्यमार्ग धरूनीच सदैव राहूं ॥
हो सद्गुणांतचि खरें सुख राहताहे ।
श्रेष्ठत्व ही परमसुंदरताच आहे ॥
लाभे मनास जरि जन्मचि स्वर्गलोकीं ।
स्वर्गास आपणहि भूवर आणुं या कीं ॥ ३ ॥

## Patriotism, Freedom, Slavery.

### (1) (*Cowper*)

England! with all thy faults,
I love thee still;
My country! and while yet a nook is left,
Where English minds and manners
may be found,
Shall be constrained to love thee
Though thy climate,
Be fickle, and thy for the year, most part
deformed,
With drifting rains and withered frost,
I would not yet exchange thy sullen skies,
And fields without a flower, for warmer
France,
With all her vines; nor for Ausonia's groves,
Of golden fruitage and her myrtle bowers.

ही इंग्रज लोकांची अत्यंत आवडती देशभक्तिपर कविता आहे. हिचें भाषांतर अगदीं ओळीला ओळ असें न करतां पहिल्या चार ओळींचें सरळ भाषांतर, नंतर पुढील ६ ओळींत इंग्लंडच्या वाईट भौगोलिक परिस्थितीचें जरा Free rendering; नंतरच्या चार ओळींत विलोभनीय देशाचें (वन्दे मातरम्मधील कल्पना घालून) वर्णन व शेवटच्या दोन ओळींत Exchange ची कल्पना आणली आहे. कवितेंत मुद्दामच इंग्लंड, फ्रान्स, इत्यादि देशनामें गाळून कोणाहि आपल्या मातृभूमीस उद्देशून ही म्हणतां यावी अशी सोय केली आहे.

## देशभक्ति, स्वातंत्र्य, गुलामगिरी

### ( १ ) ( सुमंदारमाला )

( प्रसिद्धि–सह्याद्रि नोव्हेंबर १९५३ )

तुझ्या अंगि हे मातृभूमी ! कुणीहि कितीही जरी दोष गे काढिले ।
तरी प्रेम माझें उणें लेशमात्रें कधींही न होईल त्याच्यामुळें ॥१॥

जगीं अल्पसें आश्रयस्थान लाभे तुझी वृत्ति संस्कार जेथें उरे ।
तरी प्रीति त्याच्याबरोही कराया मला तेवढें तें पुरेंसें ठरे ॥२॥

× × ×

ऋतूंना जिथें स्थैर्य कांहींच नाहीं–हवामानही पालटे सारखें ।
सदा दुर्दिनांच्यामुळें लोक झाले रवीच्या खुल्या दर्शना पारखे ॥३॥

सदा झोंबणाराच वारा हिमाचा, सदा धांवत्या पावसाच्या सरी ।
सदा हेंच अस्थैर्य संवत्सराची जणूं वांकुडी चाल जेथें करी ॥४॥

सदा साभ्र आकाशिचे अश्रु पाहून जेथें मना खिन्नता येतसे ।
स्वनेत्रांस आनंद देण्यास शेतामधें एकही पुष्प जेथें नसे ॥ ५ ॥

× × ×

कुठें अन्यदेशीं सदा सस्यशाली, सदा श्यामला सर्व भूमी जरी।
कुठें अन्य पुष्पाफलांच्या भरानें सदा नम्र ते वृक्ष, त्या वल्लरी ॥६॥

नसे उष्णता फार वा शैत्य जेथें, ऋतू योग्य काळीं सदा येउनी ।
निरभ्रावकाशांतुनी चंद्र जेथें सुखेनें मही व्यापितो न्हाणुनी ॥७॥

× × ×

तुझें देउनी दुःख, त्या ऐवजीं तें तुझ्या देशिचें सौख्य लाभे जरी ।
न घेईन पक्वान्नही तें दुज्याचें शिळी भाकरी आइची ती खरी ॥ ८ ॥

(2) (*A. W. Longfellow*)

"The Slave's Dream"

Besides the ungathered rice he lay,
His sickle in his hand;
His breast was bare; his matted hair,
Was buried in the sand;
Again in the mist and shadow of sleep,
He saw his Native Land.

Wide through the landscape of his dreams,
The lordly Niger flowed;
Beneath the palmtrees on the plain,
Once more a king he strode;
And heard the tinkling caravans,
Descend the mountain road.

He saw once more his darkeyed queen,
Among her children stand;
They clasped his neck, they kissed his cheeks,
They held him by the hand!
A tear burst from the sleeper's lids,
And fell into the sand.

Then at furious speed he rode,
Along the Niger's bank;

## (२) (वसंततिलका)

## 'गुलामाचें स्वप्न'

[आफ्रिकेंतील कोणा राजाला गुलाम करून गोऱ्यांनीं शेतांत कापणीच्या कामावर मजूर म्हणून त्याला लावलें. दमून भागून तो निजला असतां त्याला स्वप्नांत पुन्हां मातृभूमि व पूर्व वैभव दिसून त्या धक्क्यानें तो मरतो, अशी शोकान्त कथा या कवितेंत आहे— ]

शेतांत भात सगळेंच उभें असून ।
निद्रिस्त दास तिथ हातिं विळा धरून ॥
छाती दिसे उघडि; कुंतल गुंतलेले ।
त्यांचा जटाभर तिथें पुलिनांत लोळे ॥
अस्पष्ट धूसर असें परि स्वप्न आलें ।
त्या मातृभूमि-शुभ-दर्शन त्यांत झालें ॥ १ ॥

स्वप्नांतल्या अतिविशाल अशा प्रदेशीं ।
वाहात नायर नदीहि अफाट ऐशी ॥
मैदानिं नारळि-वनांतुनि हाच चाले ।
वाटे पुन्हां नृपतिवैभव प्राप्त झालें ॥
मंजु ध्वनी करितसे गलघंटमाळ ।
येतां गिरीवरुनि खालति उष्ट्रमाळ ॥ २ ॥

राणीहि कृष्णनयना दिसली पुन्हा ती ।
सारीं मुलें जमुनीं तेथ तिच्या सभोंतीं ॥
घाली मिठी कुणि गळां, कुणि चुंबतात ।
गालावरी, परि कुणी धरतात हात ॥
झोंपेंत, एक नयनांतुनि अश्रु आला ।
गालावरून पुलिनांत तिथें गळाला ॥ ३ ॥

घोड्यावरी बसुनि तेथ नदीकिनारीं ।
हा दौडतो धरुनिया गति शीघ्र भारी ॥

His bridle reins were golden chains,
And with a martial clank,
At each leap he could feel, his scabbard
of steel,
Smiting his stallian's flank.
Before him like a bloodred flag,
The bright flamingoes flew,
From morn till night he followed their
flight
Over plains where the tamarind grew,
Till he saw the roofs of Caffre huts,
And the ocean rose to view.
At night he heard the lion roar
And the hyena scream,
And the river horse, as he crushed the
reeds,
Beside some hidden stream;
And it passed like a glorious roll of
drums
Through the triumph of his dream.
The forests with their myriad tongues,
Shouted of liberty
And the blast of the desert cried aloud
With a voice so wild and free
That he started in his sleep and smiled
At their tempestuous glee.
He did not feel the driver's whip,
Nor the burning heat of day;

हातीं लगाम जणुं सांखळि सोनियाची।
अंगात ऐट भरली रणचंडिकेची॥
घेतां उडी तुरग, वाजत म्यान राही।
त्याच्या कुशीस भिडतां, पळतां पुढेंही॥ ४॥

रक्तध्वजासम सतेज नि रक्तरंगी।
त्याच्यापुढें उडति पक्षि विपत्तरंगीं॥
त्यामागुतीच सगळा दिन घालवूनी।
झाडीतुनी पुढति दौडत माळरानीं॥
भिल्लांचिया दिसति अंतिं कुटी तिथून।
अश्वी पुढें पसरला तिथ ये दिसून॥ ५॥

तो सिंहनाद घुमतो रजनींत कानीं।
चीत्कारती तरसही तिथ घोर रानीं॥
प्राणी जलस्थ, कुठल्या लपल्या झऱ्यांत।
वेत्रावली पदतलीं तुडवीत जात॥
वाद्यापरी विजयघोष करीत सारें।
स्वप्नांत हें गमत, गर्जत सर्व गेलें॥ ६॥

सारें अरण्यचि अनंत अशा जिमांनीं।
स्वातंत्र्य-घोष उठले जणुं ओरडोनी॥
तारस्वरें पवनही मरुभूमिकेंत।
सुस्वैर कर्कश अशा ध्वनि तो करीत-॥
कीं सोप जाय उडुनीं, स्मितही करीतो।
हा हर्षवायु सगळ्यांतिल पाहुनी तो॥ ७॥

जाणीव त्या तुरलि निर्दय चाबकाची।
शुद्धी नुरे तशिच दाहक आतपाची॥

For death had illuminated the land
of sleep,
And his lifeless body lay—
A worn-out fetter, that the soul,
Had broken and thrown away.

(3) (*Thomas Moor*)

## The Pride of Dyeing for thee ?

[ रॉबर्ट एमेट् हा एक आयरिश देशभक्त; देशभक्तीबद्दल याच फांशीची शिक्षा झाली त्यावेळीं मातृभूमीला उद्देशून त्यानें काढलेले हे उद्गार आहेत. स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या कित्येक कवितांत अगदीं असेच विचार आलेले आहेत! देशभक्त, मग तो कोणत्याहि काळातला वा देशांतला असो, एकसारख्याच शब्दांनीं बोलत असतो. ]

*Robert Emmett* :

When he who adores thee, has left but
the name,
Of his faults and his sorrows behind;
O say wilt thou weep when they darken
my fame
Of the life that was for thee resigned ?

Yes, weep, and however my foes may
condemn
Thy tears shall efface their decree.
For heaven can witness ! though guilty
to them,
I have been but too faithful to thee !

तों स्वप्नभूमि उजळे यमराज येतां ।
त्याचें उरें शवचि, जीव निघून जातां ॥
वाटे जणूं झिजुन खोळहि जीर्ण झाली ।
आत्मा त्यजी तिजसि तोडुन तेथ खालीं ॥ ८ ॥

( ३ ) ( शार्दूलविक्रीडित )

हौतात्म्यांतलें गौरव

[ प्रसिद्धि—सह्याद्रि, सप्टेंबर १९५३ ]

जेव्हां मानुति, दुःख, दोष सगळे यांच्या स्मृती ठेवुनी ।
निर्वाणाप्रति भक्त जाई तव गे माते ! तुला सोडुनी ॥
जें आयुष्य तुला समर्पित, तया फासोनि काळें यदा ।
बंधू निंदिति, अश्रु काय नयनीं आई ! तुझ्या ये तदा ? ॥१॥

वाहूं दे तव अश्रु; शत्रु कितिही मातें जरी निंदिती ।
दोषारोप समय ते धुउनिया अश्रू तुझे टाकिती ॥
त्यांचा मी अपराधि मान्य जरि हें, देवास हेंही कळे— ।
कीं सीमाधिक मी इमानचि तुझें आई ! जगीं पाळिलें ॥२॥

With thee were the dreams of my earliest love,
Every thought of my reason was thine;
In my last humble prayer to the spirit above,
Thy name shall be mingled with mine.

Oh blessed are the lovers and friends who live,
The days of thy glory to see;
But the next dearest blessing that heaven can give,
Is the pride of thus dying for thee.

( 4 ) ( *Scott* )

[इंग्रजी देशभक्तिपर कवितांत हीहि अशीच गाजलेली कविता आहे. इतरांच्या मानानें स्कॉटची भाषा अतिशय वीरश्रीयुक्त व स्फूर्तिदायक असते. स्वार्थी, देशभक्तिशून्य माणसाला, मरण हें unwept, unhonoured & unsung येईल ही त्याची शापवाणी ब्रह्मदेवाला सुद्धां पुसून टाकता येणार नाहीं.]

Breathes there the man with soul so dead,
Who never to himself hath said,—
" This is my own—my native land ?"
Whose heart hath never within him burned,

As home his footsteps he hath turned—
From wandering on a foreign strand ?
If such there breathe, go mark him well
For him no minstrel raptures swell,

स्वप्नें मीं पाहिलीं तुझ्याच विषयीं माते ! जगीं पाहिलीं ।
ही संपूर्ण विचारशक्तिच तुझ्या प्रेमास मीं वाहिली ॥
अंतीं नम्रचि होउनी प्रभुपदा मी लेघवा प्रार्थिन ।
माझ्याशीं तव नाम संतत सदा राहील तें जोडुन ॥ ३ ॥

भाग्याचे दिन येति या जननिला, ते सर्व पाहावया ।
प्रेमी मित्र जगांत राहतिल जे, धन्यत्व लाभे तयां ॥
खालोखाल तयाहुनी मजसि गे ? सद्भाग्य हें वाटतें ।
कीं मातेस्तव हें असें मजपरी आलिंगणें मृत्युतें ॥ ४ ॥

( ४ ) ( शार्दूलविक्रीडित )

आहे का कुणि या जगांत इतुका मेल्यापरी अंतरीं ? ।
नाहीं ज्या हृदयीं कधींच उठली उत्स्फूर्त ही वैखरी ॥
" आहे माझिच भूमि ही, मम असे ही देशमाता खरी ? "
दुर्दैवें बहुकाल जो भटकुनी नाना विदेशांमधीं—॥ १ ॥

येताना स्वगृहास, पाय वळवी देशाकडे तो जधीं ।
देशप्रेम उचंबळूनि हृदयीं ज्याच्या न येई तधीं ॥
ऐसा कोणि असे जरी अधम, त्या घ्या नीट हो पाहुनी ।
त्याची कीर्ति न कोणि भाट कधिही गाई मनीं हर्षुनी ॥२॥

High though his titles, proud his name,
Boundless his wealth as wish can claim
Despite those titles, power and pelf,
The wretch, concentred, all in self,

Living, shall forfeit fair renown,
And doubly dying shall go down—
To the vile dust from whence he spr
Unwept, unhonoured, and unsung.

(5) (*Sir Cecil Springrice*)

I vow to thee, my country !—
all worldly things above—
Entire, and whole, and perfect,
the service of my love.
The love that asks no questions,
the love that stands the test —
That lays upon the alter,
the dearest and the best.
The love that never falters,
the love that pays the price,
The love that makes undaunted,
the final sacrifice.

× × ×

And there's another country,
I have heard of long ago,
Most dear to them that love her,
most great to them that know.
We may not count her armies,
we may not see her king,

मोठ्याही पदव्या जरी असति त्या, तें नाम मोठें जरी ।
इच्छा होइल ती अनंत जरि हो संपत्ति त्याच्या घरीं ॥
शान्या त्या पदव्या, प्रभुत्व, धनही तें व्यर्थ सारें परी ।
होई मानव स्वार्थकेंद्रित सदा नीच स्वयें तो जरी ॥ ३ ॥
मृत्यूपूर्वि यशःशरीर मरतां तो मृत्यु हो एकदां ।
देहीं मृत्यु पुन्हां अशा द्विमरणीं नीचाचि जाई पदा– ॥
होई लीन मलीन धूळींत सदा–हा जन्मला जेथुनी, ।
कोणी त्यास रडे न, मान नच दे, किंवा न गातें कुणी ॥४॥

## मातृभूमि आणि पितृभूमि

[ सर सेसिल स्प्रिंगराइस् हे कांहीं वर्षे अमेरिकेंत इंग्लंडचे वकील होते. इहलोक सोडून जाण्याची वेळ जवळ आली आहे– व परलोक दिसूं लागला आहे— अशा वेळीं मृत्यूपूर्वी एक महिना ही कविता त्यांनीं लिहिली असें म्हणतात. पहिल्या सहा ओळींत मातृभूमीसाठीं पूर्णाहुति करण्याचें वर्णन असून पुढच्या सहा ओळींत स्वर्गीच्या ईश्वरी राज्याचें वर्णन आहे. ]

( ५ ) ( मंदारमाला ) ( सुमंदारमाला ) [ मिश्र ]
[ प्रसिद्धि—'सह्याद्रि' दिवाळी अंक, १९५१ ( पान ७०४–५ )]

तूं ऐहिकाहून अत्यंत मोटी, पहा मातृभू ! मी प्रतिज्ञा करीं ।
अर्पीन निःशेष संपूर्ण माते ! तुझ्यापायिं मत्प्रेमसेवा पुरी ॥१॥
असें प्रेम–जीं प्रश्न जें ना विचारी–टिके जें कसाही कसोटीवरी ।
होमीन अत्यंत जें जें प्रिय, श्रेष्ठ, तें तें तुझ्या यज्ञवेदीवरी ॥२॥
कधीं प्रेम मोल न मागार घेई, पुरें मोल देण्या सदा सिद्ध तें ।
करायाहि अंतिम त्याग ज्यातें न भीती कशाची कधीं वाटते ॥३॥

× × × × × ×

कधींपासुनी ऐकिलें मी असें की दुजा कोणि आहे असा देश तो ।
बहु आवडे, प्रीति ज्यांना तयाची; तया जाणिती, श्रेष्ठ त्यां वाटतो ॥४॥

Her fortress is a faithful heart;
her pride is suffering.
And soul by soul and silently
her shining bounds increase;
And her ways are ways of gentleness;
and all her paths are peace.

(6) (*Patrick Henry*)

Is life so dear, or peace so sweet, as to be purchased at the price of slavery & chains?

God forbid! I know not what course others may take, but as for me,

Give me Liberty or give me Death!

(7) (*Byron*)

**"Prisoner of Chillon"**

Eternal spirit of the chainless mind!
Brightest in dungeons, Liberty, thou art!
For there thy habitation is the heart—
The heart which love of thee alone can bind!

(8) (R. *G. Ingersoll*)

What light is to the eyes—
What air is to the lungs,
What love is to the heart—
Liberty is to the soul.

(9) (*Thomas jefferson*)

The God that gave us life,
gave us Liberty, at the same time!

न ये मोजतां सैन्य, राजा तयाचा, दिसेना कुणाला, कुठें तो जरी ॥
"हृदीं एकनिष्ठा" असे दुर्ग त्याचा, महत्ता तयाची तितिक्षा खरी ॥५॥
तेजाळ सीमा हळूं वाढते—जेथ आत्म्यास आत्मा नवा भेटतां ।
जिथें मार्ग पाऊलवाटा तशा त्या जणूं मूर्त सौजन्य नी थाटता ॥६॥

( ६ ) ( भुजंगप्रयात )

नरा जीव प्यारा असे एवढा कां ! । असे शांतिही गोड ती एवढी कां! ।
तयासाठिं कीं पत्करावी सुखानें । सदा शृंखला बद्धताही नरानें !!॥१॥
घडो हें न देवा ! दुजे वर्ततात ! न मी जाणितों केविं ऐशा स्थितींत ! ।
परंतू मला एक स्वातंत्र्य द्या;वा । सुखेनैव कार्यांत या मृत्यु द्यावा ॥२॥

( ७ ) ( आर्या )

निःशृंखल हृदयाची स्फूर्ति सदाची ! स्वतंत्रते माते ! ।
अंधार-कोठडींतचि विशेष तेजें प्रकाश तव दाटे ॥ १ ॥
कारण, तेथें राहे ऐशा हृदयांतची तुझा वास ।
कीं स्वप्रेमावांचुनि कुणिही बांधूं शके न कधिं ज्यास ॥२॥

( ८ ) ( भु. प्र. )

हवा सर्व नेत्रास जैसा प्रकाश । हवा ही हवी जेविं या फुप्फुसांस ॥
हवी वाटते अंतरंगास प्रीति । तशी अंतरात्म्यासही मुक्तता ती ॥

( ९ ) ( भु. प्र. )

दिला जीव मातें जया ईश्वरानें । दिली मुक्तता त्याचवेळीं तयानें ॥

(10) (*F. D. Roosevelt*)

We would rather die on our feet,
Than live on our knees !

(11) (*Bertrand Barere*)

The tree of Liberty grows—*Only when* watered by the blood of tyrants.

(12) (*W. C. Brann*)

No man can be a patriot on an empty stomach!

(13) (*Byron*)

He who loves not his country—
—can love nothing !

(14) (*Macaulay*)

To every man upon the earth,
Death cometh soon or late;
And how can a man die better,
Than *facing fearful odds ?*—
For the ashes of his fathers,
And the temples of his Gods !

(15) (*James Opphenheim*)

They set the slave free, striking off his chains,
Then he was as much a slave as ever.
His slavery was not in his chains,
but in himself,
They can only set,-free men,-free.
And there is no need for that,—
Free men set themselves free !

( १० ) ( फटका )

गुडघे टेकुनि जगण्यापेक्षां उभे राहुनी मरण बरें।
( अपमानानें जगण्यापेक्षां, मान राखुनी मरण बरें। )

( ११ ) ( आर्या )

पीडक रक्तानेंची, वाढे स्वातंत्र्यवृक्ष या जगतीं।

( १२ ) ( पृथ्वी )

मिळे न जिथ खावया, तिथ न देशभक्ती रुजे ! ।

( १३ ) ( वसंततिलका )

ज्या मातृभूप्रतिहि प्रेम मुळीं असेना ।
तत्प्रीतिला विषय कोणि कुठें मिळेना ।।

( १४ ) ( वसंततिलका )

जो जन्म घेउनि इथें जगतांत आला ।
मार्गे पुढें खचित मृत्युहि ठेवलेला ।।
तीं पूर्वजस्मृति पवित्रचि रक्षिण्याला ।
तें देवमंदिर अभंगचि ठेवण्याला ।।
मोठया प्रचंड अरिशीं लढुनी मरावें ।
याहून तें मरण थोर कसें असावें ! ।।

( १५ ) ( स्रग्धरा )

तोडोनी शृंखलातें, कुणि जरि करिती दास तो बंधमुक्त ।
दासत्वाची परी ती तिळभरहि कमी वृत्ति त्याची न होत ।।
राहे ना शृंखलांतीं; हृदयिंच वसते बद्धता मानवाची ।
मुक्तात्म्यातेंच देऊं शकतिल कुणिही बाह्य–ही मुक्ति साची ।।१।।
अंतर्मुक्ता दुज्यानें जरुरिच नसते मुक्तता द्यावयाची ।
अन्यत्साह्याविनाही, सकल नर असे मुक्त होती स्वयेंची ।।२।।

(16) (*J. R. Lowell*)

Men, whose boast it is that ye,
Come of fathers brave and free,
If there breathe, on earth a slave,
Are you truely free and brave ?

(17)

O Liberty ! what crimes have been
committed in thy *name* !

(18)

Better to reign in Hell—
—Than serve in Heaven !

(19) ( J. R. *Lowell* )

They are slaves, who fear to speak,
For the fallen and the weak.
They are slaves, who will not choose,
Hatred, scoffing and abuse,—
Rather than in silence shrink,
From the truth they needs must think.
They are slaves, who dare not be,
In the right, with two or three !

(20) ( *Lovelace* )

Stone walls do not a prison make,
Nor iron bars a cage,
Minds innocent and quiet take,
That for an hermitage.

( १६ ) ( व. ति. )

मारूं नका कुणि तुम्हीं अपली बढाई ।
शूर स्वतंत्र निजपूर्वज जाहले ! ही ॥
राहे जिवंत जरि एक गुलाम येथें ।
शूर, स्वतंत्र, तुम्हिही न ! असत्य का तें ! ॥

( १७ ) ( शा. वि. )

स्वातंत्र्या ! तव नाम घेउनि जगीं पापें किती चालतीं ! ।

( १८ ) ( पृथ्वी )

मिळो नरकराज्य तें परि न दास्य तें स्वर्गिचें ।

( व. ति. )

स्वर्गांत राहुनि गुलामगिरी कपाळीं ।
त्याहून राज्य नरकीं किति भाग्यशाली ॥

( १९ ) ( व. ति. )

घेवोनिया पतित, दुर्बल, पक्ष याचे ।
भाडूं न जे धजति, तेच गुलाम साचे ॥
सत्यार्थ, द्वेष, उपहास, कुशब्द हेही ।
स्वीकारणें कठिण ज्या हृदयास होई ॥१॥

सत्यास पाहुन इकूच पळून जाती ।
ते बद्ध या जगिं, गुलामहि तेच होती ॥
सत्पक्ष, अल्पबळ तो म्हणुनी, तयास ।
जे साह्य देति नच, तेच गुलाम खास ॥२॥

( २० ) ( भु. प्र. )

धिलाभित्तिनीं बंदिशाला न होई ।
न लोखंडि कांबामुळें पिंजराही ॥
न अस्वास्थ्य या पाप ज्याच्या मनांत ।
तयां आश्रमाचे परी मानतात ॥१॥

If I have freedom in my love,
And in my soul am free,
Angels alone that soar above,
Enjoy such liberty.

(21) (*Macaulay*)

Then none was for a party—
Then all were for the state,
Then the great man loved the poor,
and the poor man loved the great.
Then lands were fairly partitioned,
then spoils were fairly sold,
The Romans were like brothers,—
In the brave days of old.



## Part 12—Wealth, Poverty, Avarice etc.

(1) (*Voltaire*)

When it is a question of money,
Everybody is of the same religion.

(2)

Money is a good servant but a bad master.

(3) (*William Cobbett*)

To be poor and independant,
is nearly an impossibility.

(4) (*John Florio*)

Poverty is no vice, but an inconvenience.

जरी माझिही प्रीति निर्बंधमुक्त ।
जरी दास्य नाहींच या अंतरांत ।।
भराऱ्या वरी मारिती देवदूत ।
खरे तेच माझ्याशि हो तुल्य होत ।।२।।

( २१ ) ( फटका )

नव्हता पक्षाभिमान कोणा—देशास्तव झटती सारे ।
थोरहि दीना साह्य करि,—तसे, दीनांहि त्यांवर प्रेम खरें ।।१।।
विभागली भू न्याय्यरीतिनें—लुटींत सर्वां भाग मिळे ।
होते रोमन बंधुसारखे—जुन्या शौर्यकालामधलें ।।२।।

---

विभाग १२—धन, श्रीमंती, दारिद्र्य, लोभ इ.

( १ ) ( आर्या )

येतां प्रश्न धनाचा, सर्वहि बनती समानधर्माचे ।

( २ ) ( आर्या )

विश्वास राववावें, स्वतां न व्हावें गुलाम कधिं त्याचे ।

( ३ ) ( फटका )

दरिद्रि असुनी स्वतंत्र असणें दिसे अशक्यप्रायचि तें ।

( ४ ) ( फटका )

दारिद्र्यता ही दुर्गुण नोहे, पदोपदीं ती परि नडते ।

(5) (*Samuel Johnson*)

This mournful truth is,
everywhere confessed,
Slow rises worth, by poverty depressed!
But here more slow,
where all are slaves of gold,
Where looks are marchandise,
and smiles are sold.

(6) (*Halliburton*)

No man is rich, who spends more than he gets
& no one is poor, who earns more than he spends.

(7) (S. *Smith*)

In extreme trouble, money is without value; & even the use of it may be as nothing; only the opportunity to serve a friend with it is priceless!

(8) (*Hore*)

I take him to be the only rich man, that lives upon—what he has, owes nothing and is content. There is no determinate sum of money nor quality of estate, that can denote a man rich, since no man is truely rich, that has not so much as perfectly satisfies his desire of having more, for the desire for more is want, and what is poverty if not want?

(9) (*Cook*)

We only realise the value of money,
when we do good to others with it!

( ५ ) ( फटका )

दुःखद असलें, तरी सत्य हें सर्वमान्य जाहलें इथें ।
दारिद्र्याच्या लोढण्यामुळें कष्टें पात्रत्वही उठे ॥ १ ॥
विशेष कष्टें; जेथें सारे गुलाम असती सोन्याचे ।
सुंदरता ही वस्तु विक्रिची-स्मितही जेथें विकायचें ॥ २ ॥

( ६ ) ( अनुष्टुप् )

उत्पन्नाधिक जो खर्ची, तो कधींही धनी नसे ।
व्ययाधिक मिळे ज्यातें त्या दरिद्री म्हणूं कसें ॥

( ७ ) ( उपजाति )

खन्याखुऱ्या घोरचि संकटांत । धनांतलें मूल्यचि नष्ट होत ॥
घ्यावा जरी हो उपभोग त्याचा । तो सर्वही केवळ शून्य साचा ॥
सर्वमित्र सेवा घडते तयानें । हें एकची मात्र अमोल मानें ॥

( ८ ) ( व. ति. )

आहे तयात गरजा निज मागवीतो। देणें न ज्यास कवडीहि कुणाप्रती, तो।
संतोष ज्यास मिळतो निजमानसाचा। तो एक मी समजतों धनवान साचा॥
संपत्तिही, असुक निश्चितशी मिळून। वा शेत आणि घर हें इतुकें असून।
नाहीं प्रमाणाचि कुठें जगतात येथें। कीं, एवढें मिळुनिया धनिकत्व येतें॥

इच्छा, 'मिळो अधिक' ही शमवील पूर्ण ।
ज्या एवढें न धन, तोहि खरा धनी न ॥
इच्छा ' मिळो अधिक ' हीच उणीव होय ।
दारिद्र्य हेंहि उणिवेहुनि अन्य काय !॥

( ९ ) ( उपजाति )

अर्थांतलें मूल्य कळून येतें । परोपकारार्थचि योजितां तें ॥

(10) (*Johnson*)

The covetous man never *has* money;
The prodigal will soon *have* none.

(11) (*Spenser*)

A circle cannot fill a triangle; so can neither the whole world–the heart of an avaricions man–even if it were possible to measure it!

(12) (*Macllaren*)

Not poverty but thirst for riches
*Makes a tragedy of human life !*

(13) (*Zimmerman*)

Many have been ruined by their fortunes,
Many have escaped ruin by want of fortune!

(14) (*Cook*)

The shame of poverty is almost
as bad as pride of wealth.

(15) (*Gothe*)

No one should be rich except one
who understands it !

(16) (*I. T.*)

A coveteous man heaps wealth
not to enjoy but to keep it.

(17) (E)

Pay off what you owe,
& what you are worth you'll know.

(18) (*Gothe*)

Poverty & hunger have scores of
learned disciples !

---

(१०) (अनुष्टुप्)

धन हावरटापाशीं पद्य केंद्रांत हें नसे ।
उधळ्याचें शीघ्र होईं आहे तें नव्हतें असें ।।

(११) (उपजाति)

झालें जरी मापन शक्य सार्चें । लोभी अशा मानवमानसाचें ।
पृथ्वीहि त्या पूर्ण भरूं शके न । न वर्तुळानें भरतो त्रिकोण ।।

(१२) (व. ति.)

निर्द्रव्यता न, परि हावचि ही धनाची ।
शोकान्तिका करितसे नरजीवनाची ॥

(१३) (भु. प्र.)

किती, संपदेनें जगीं नष्ट झाले ।
किती त्या अभावें बचावून गेले ।।

(१४) (मालिनी)

धनमद जितुका तो योग्य नाहीं कुणात ।
जवळजवळ तैशी लाज द्रारिद्यजात ।।

(१५) (भु. प्र.)

कळे ज्यास श्रीमंतिचा अन्वयार्थ । न त्यावीण श्रीमंत कोणी असोत ।।

(१६) (उपजाति)

न भोगण्या, केवळ ठेवण्याला ।
लोभी करीतो धनसंचयाला ।।

(१७) (व. ति.)

देणें तुझें सकल फेडुनि टाकिता तें ।
राहे तुझें तुजसि काय कळेल नूतें ।।

(१८) (उ. जा.)

होती क्षुधेचे नि दरिद्रतेचे ।
असंख्य विद्वज्जन शिष्य साचे ।।

## Part 13—Happiness, Misery, Sorrow

### (1) (*Henry Wotton*)

### " The character of a Happy man "

How happy is he born and taught,
That serveth not another's will;
Whose armour is his honest thought,
And simple truth his utmost skill. 1

Whose passions not his masters are,
Whose soul is still prepared for death,
Untied unto the world by care,
Of public fame or private breath. 2

Who hath his life from rumours freed,
Whose conscience is his strong retreat,
Whose state can neither flatterers feed,
Nor ruin make oppressors great. 3

Who God doth late & early pray
More of his grace than gifts to lend,
And entertains the harmless day
With a well chosen book or friend. 4

This man is freed from servile hands,
Of hope to rise or fear to fall;
Lord of himself, though not of lands,
And having nothing, yet hath all ! 5

### (2) (*Shelley*)

Our sincerest laughter,
with some pain in fraught;

## विभाग १३–सुखदुःख

### ( १ ) ( भुजंगप्रयात )

### सुखी माणूस

सुखी तो किती ! जन्म संस्कार ज्याला ।
मिळोनी, दुज्याचा न जो दास झाला ।।
असे रक्षिका ज्या सचोटी स्वतांची ।
ऋजू सत्य कौशल्यसीमा जयाची ।। १ ।।
विकारांचिया जो न आहारिं जाई ।
सदा मृत्युच्या स्वागता सिद्ध राही ।।
जनीं कीर्ति वा गुप्तनिंदा यशांची ।
न चिंता जगीं गुंतवी ज्यास साची ।। २ ।।
कुटाळींतुनी जो स्वतां मुक्त झाला ।
विशुद्धांतरीं थोर आधार ज्याला ।।
स्तुतीपाठकां पोषिते सुस्थिती ना ।
न नाशें महत्ता मिळे पीडकांना ।। ३ ।।
सदा मग्न देवाचिया प्रार्थनेंत ।
कृपेवांचुनी नान्य हेतू मनांत ।।
खरे मित्र वा ग्रंथ या संगतींत
दिनाचा सुखें काळ हा घालवीत ।। ४ ।।
अधःपात–भीती तशी वैभवाशा ।
असे दास्यबंधांतुनी मुक्त ऐसा ।।
धनी हा स्वताचा–जरि भूमि नाहीं ।
नसे कांहिही– यांतची सर्व कांहीं ।। ५ ।।

( प्रसिद्धि ' सह्याद्रि ' जानेवारी १९५२ )

### ( २ ) ( वसंततिलका )

येई उचंबळुनि हास्य तरी तयांत ।
थोडेंतरी मिसळुनी मनिं दुःख होत ।।

Our sweetest songs are those,
that tell of saddest thought.

(3) (*Robert G. Ingersoll*)

The way to be happy is to make others so.

(4) (*Dante*)

There is no greater sorrow, than to recall in misery, the time when we are happy.

(5) (*John Flavel*)

Man's extremity, is God's opportunity.

(6) (*Shakespeare*)

Good night! Good night!
parting is such sweet sorrow,
That I shall say good night
till it be tomorrow.

(7)

Pleasures are like poppies spread,
You seize the flower, it's bloom is shed.

(8)

I want to be happy,
I want you to be happy,
But I can't be happy myself,
Unless I make you happy too!

(9)

The surest way to be happy,
is to make others so.

(10) (*Francis Thompson*)

Nothing begins and nothing ends,
That is not paid with moan,

अत्यंत गोड अमुचीं जगिं तींच गाणीं ।
अत्यंत दुःखमय जीं कथितीं कहाणी ॥

( ३ ) ( भुजंगप्रयात )

दुजा सौख्य देणें खरें सौख्य हेंच ।

( ४ ) ( इंद्रवज्रा )

दुःखांत जो आठवितो सुखातें ।
नेतोच दुःखा परमावधीतें ॥

( ५ ) ( भुजंगप्रयात )

असे दुःखसीमाच जी मानवाची । सुसंधीच ती हो ठरे ईश्वराची॥

( ६ ) ( स्रग्धरा )

जाती रात्री सुखाची ! मधुरचि इतुकें दुःख होतें वियोगीं ।
" जातों ! जातों !" म्हणोनी उजडत तंवरी हेंचि मी सौख्य भोगीं ॥

( ७ ) ( वसंततिलका )

हो सौख्य पुष्प जणुं कोमल पारिजात ।
घेतांच हातिं झणिं चोळवटून जात ॥

( ८ ) ( भुजंगप्रयात )

मला वाटतें कीं सुखी मीं असावें ।
तुलाही तसें सौख्य, वाटे मिळावें ॥
सुखी तोंवरी मी कधींही नसेन ।
तुला जोंवरी ना सुखी मी करीन ॥

( ९ ) ( पृथ्वी )

दुज्यास करणें सुखी, स्वसुखमार्ग हाची खरा ।

( १० ) ( भुजंगप्रयात )

असा जन्म नाहीं, असा मृत्यु नाहीं ।
न ज्याच्यासवें दुःखही तीव्र राही ॥

For we are born in another's pain,
And perish in our own.

( 11 ) ( *Omar Khayyam* )

A book of verses underneath the bough,
A jug of wine, a loaf of bread–and thou,
Beside me singing in the wilderness,
Oh, wilderness were paradise enow!

( 12 )

Happyness is like a perfume,
which you cannot sprinkle on others,
without getting—
some yourself.

---

## Part 14—Mercy, Kindness

( 1 ) ( *Shakespeare* )

The quality of mercy is not strained;
It droppeth as a gentle rain from Heaven—
Upon the place beneath. It is twice blest,
It blesseth him that gives and him that takes.
'Tis the mightiest in the mightiest; it becomes
The throned monarch better than his crown;
His sceptre shows the force of temporal power
The attribute to awe and majesty.

दुज्या दुःख देवोनियां जन्म घेतो ।
स्वतां दुःख भोगून-तदा मृत्यु येतो ॥

( ११ ) ( शार्दूलविक्रीडित )

' इहलोकांतील सौख्यसीमा ' ( भौतिकवाद्यांच्या दृष्टीनें )

काव्यग्रंथचि एक, एक सुरई मद्यार्क लाभो मला ।
खाण्या भाकर एक अन् तरुतळीं तूंही तिथें प्रेमला ॥
मत्पार्श्वी तव दिव्यगायनसुधा रानांत वाहे जधीं ।
सारें जंगल मंगलप्रद नव्या स्वर्गापरी तें तधीं ॥

( १२ ) ( वसंततिलका )

जैसें सुगंधजल शिंपडितां दुज्यातें ।
थोडेंतरी निजतनूवरती पडे तें ॥
देतां दुज्यास सुखही घडतें तसें तें ।
दात्यास अल्पतरि त्यांतिल प्राप्त होतें ॥

---

## विभाग १४—दया, परोपकार

( १ ) ( शार्दूलविक्रीडित )

नोहे कृत्रिम हो दयागुण कधीं; देणें असे ईश्वरी ।
स्वर्गांतून हळूंच भूवरि पडे तो मंदवृष्टीपरी ॥
याचा हो सुविशेष कीं द्विविध हा कल्याणकारी असे ।
दात्याचें हित, तेविं, घेइल दया, त्याचेंहि साधीतसे ॥ १ ॥

आहे हाच बलिष्ठ सर्व जगिंच्या त्या श्रेष्ठ शक्तीहुनी ।
शोभा दे अभिषिक्त त्या नृपतिला त्याच्या किरीटाहुनी ॥
आहे ऐहिकशक्तिच्या नृपतिचा दंड प्रतीकापरी ।
राहे निर्भर, भीति वैभव सदा त्या राजदंडावरी ॥ २ ॥

Wherein doth sit the dread and fear of kings;
But mercy is above all sceptred sway.
It is an attribute to God himself;
And earthly power doth then show likest God's
When mercy seasons justice.

(2) (*Henry Burton*)

Have you had a kindness shown ?
—Pass it on !
It was not given for thee alone,
—Pass it on !
*Let it travel down the years,*
*Let it wipe another's tears,*
Till in heaven the deed appears—
—Pass it on !

(3) (*Old Testament*)

Blessed is he, that considereth the poor.

(4) (*Tulia Carney*)

Little drops of water; little grains of sand,
Make the mighty ocean, and pleasant land,
Little deeds of kindness, little words of love,
Help to make earth happy like the
heaven above.

( न प्रेमें नच आदरें जगिं बघे राजाकडे हो कुणी )।
राजाच्याविषयीं भया उपजवी ह्याची प्रजेच्या मनीं ॥
दंडाधिष्ठित शक्तिच्या पलिकडे राहे दयालुत्व तें।
साक्षात् ईश्वररूपची जणुं दयारूपें अहा नांदतें ॥ ३ ॥
दैवी शक्तिस तुल्य ऐहिक दिसे, शक्ती खरी तेधवां।
सोडी न्याय कठोरता, मिसळतां त्यामाजी दया-जेधवां ॥

( २ ) ( केशवकरणी )-दयेचें चक्र

तुझ्या जीवनीं दया कुणी का तुजवर केली नरा ! ।
वाहुं दे दया, बनुनिया झरा ॥ १ ॥
तुझ्या एकट्यास्तवचि दया ती तुजला नाहीं दिली।
वाहुं दे दया सर्व भूतलीं ॥ २ ॥
तिज वर्षोवर्षी पुढें पुढें जाउं दे, ।
दुसऱ्यांचे अश्रू तिला पुसुनि घेउं दे, ।
स्वर्गात शेवटीं तिला स्थान लाभुं दे ।
दयाघनाची वृष्टि तापल्या महीस या निववुं दे, ।
दयेचें चक्र असें चालुं दे ॥ ३ ॥

( ३ ) ( भुजंगप्रयात )

सदा घेइ जो रंगल्यागाजल्यावा ।
परामर्श तोची जगीं धन्य साचा ॥

( ४ ) ( शार्दूलविक्रीडित )

छोटेसे जलबिंदु, तेवि कण ते वाळूंतले सानही ।
याच्यातूनचि होति सागर महा, अन् सौख्यदात्री मही ॥
छोटेसे उपकार, शब्दहि तसे ते अल्पसे प्रीतिचे ।

(5) (*A. W. Peach*)

O Youth ! with song and laughter
Go not so lightly by,
Have pity— and remember,
How soon thy roses die !

(6) (*Shakespeare*)

Mercy but murders,
that pardons those that kill !

(7) (*Wilcox*)

So many Gods, so many creeds,
So many paths that wind & wind;
While just the act of being kind-
Is all the sad world needs !

(8) (*Diderot*)

Stretch your own hand to give & spare the poor man the shame of holding out his hand !

(9) (*Seneca*)

He who has conferred a kindness should be silent. He who has received one should speak of it.

(10) (*Pope*)

The blind man bears the lame & onward hies
Made perfect by lending feet & borrowing eyes!

(11) (*Cotton*)

We can all do more than we have done, &
be not a whit the worse.
It never was loving that emptied the heart
Nor giving that emptied the purse.

( ५ ) ( वसंततिलका )

हे यौवना ! हंसत गात सुरेल गाणें ।
जावें न येथुन अलिप्त अशा मनानें ॥
ठेवी दया हृदयिं—हेंचि परी स्मरोनी ।
जाई गुलाब किति लौकर तो सुकोनी ॥

( ६ ) ( रथोद्धता )

घातक्यास करिते क्षमा तरी । ती दयाच ठरते खुनी खरी ॥

( ७ ) ( वसंततिलका )

कित्येक देव नि कितीतरि धर्मपंथ ।
ते गोल गोल जगिं मार्ग किती अनंत ॥
द्यावी दयाच परि एक नरें दुज्यास
दुःखी जगास पुरतें इतुकेंच खास ॥

( ८ ) ( वसंततिलका )

द्यावें स्वहस्त पसरूनचि दान दीना
त्यांतें करां पसरवून न लाज आणा ॥

( ९ ) ( उपेंद्रवज्रा )

करीतसे जो उपकार, त्यानें । कधीं न तो बोलुन दाखवीणें ॥
परंतु घेई उपकार, त्यानें । न सांगतां तो, न कधीं रहाणें ॥

( १० ) ( शार्दूलविक्रीडित )

स्कंधीं वाहुनि लंगड्यास सुपथें जाई पहा आंधळा ।
देऊनी पद, घेउनी नयन ते पूर्णत्व ये त्याजला ॥

( ११ ) ( शार्दूलविक्रीडित )

केलें त्याहुनि जास्त, शक्य करणें सर्वांसही आपणां ।
होतो त्याहुनि लेशमात्रहि उणें वाटेल त्यानेंहि ना ॥

(12) (*Shakespeare*)

A rich gift waxeth poor
when the giver proveth unkind.

(13) (*St. Basil*)

A good deed is never lost.
He who sows courtesy—reaps friendship.
He who plants kindness—gathers love.

(14) (*Charron*)

One who gets a good turn shouldn't forget it.
He who does *one*, shouldn't remember *it* !

(15) *Sheikh Saadi* (*Gullistan*)

In prosperous days
go seek out the distressed;
The poor man's prayer
may change misfortunes course.
Give, when the poor, humbly makes request
Lest the oppressor takes from thee by force.

(10) (*Beecher*)

Compassion cures more sins than condemnation.

---

(15) Love

(1) (*Thomas Moore*)

There is nothing half so sweet in life,
As love's young dream !

( १२ ) ( वसंततिलका )

दाता धरील जर निर्दयताच सारी ।
होईल दान बहुमूल्यहि तें भिकारी ॥

( १३ ) ( उपजाति )

सत्कार्य केव्हांहि न नष्ट होतें । ( कधीं तरी त्या सुफलत्व येतें) ॥
जो पेरितो बीज सुसभ्यतेचें । तो कापितो पीकहि मित्रतेचें ॥
जो रोप लावील दयास्वरूप । त्या प्रीतिचें पीक मिळे अमूप ॥

( १४ ) ( अनुष्टुप् )

तुजा मलें करी तूंतें । विसरूं तूं नकोस तें ॥
करितो जो मलें त्यानें । तें ध्यानात न ठेवणें ॥

( १५ ) ( शार्दूलविक्रीडित )

येतां वैभव, तूंच, दुःख हरण्या जा दुःखितां शोधित ।
दैवाची गतिही फिरे कधिंकधीं, देता दुवा पीडित ॥
मार्गी याचक दीन, तींवरिच दे तूं दान; नाहीं तर ।
कोणी पीडक, गाजुनीच तुजला, नेईल तें सत्वर ॥

( १६ ) ( अनुष्टुप् )

दया, रागावण्याहून । पापें अधिक निस्तरी ॥

विभाग १५–प्रेम, प्रेमभंग वगैरे

( १ ) ( साकी )

मुग्धप्रेमा पहिलींवहिलीं जीं जीं स्वप्नें दिसतीं ।
त्यांच्या अर्ध्याचीहि माधुरी कथांत नाहीं जगतीं ॥

(2) (*Shakespeare*)

But love is blind and lovers cannot see
The pretty follies that themselves commit.

(3) (*Herbert Shipman*)

Across the gateway of my heart,
I wrote "No thoroughfare!"
But love came laughing by, and said,
"I enter everywhere."

(4) (*Shelley*)

The fountains mingle with the river,
And the rivers with the ocean;
The winds of heaven mix forever,
With sweet emotion;
Nothing in the world is single,
All things by a law divine,
In one-anothers' being mingle,
Why not I with thine?

(5) (*Tennyson*)

'Tis better to have loved and lost,
Than never to have loved at all.

(6) (*George Whither*)

**"Lover's Resolution"**

Shall I wasting in dispair
Die because a woman is fair?

( २ ) ( साकी )

प्रेम असे अंध हें म्हणोनिच प्रेमिक पाहुं न शकती ।
मधुरमधुरसे वेडे चाळे स्वतांच जे आचरिती ॥

( ३ ) ( साकी )

हृदयाच्या मीं द्वारीं लिहिलें,
"सर्वां मार्ग न इथुन"
हांसत आलें प्रेम, वदे—
"मज प्रवेश सर्वांतून"

( ४ ) ( भुजंगप्रयात )

झरे लीन होती सदाचे नद्यांत ।
नद्याही तशा सर्व त्या सागरांत ॥
पहा होति आकाशिचे सर्व वात ।
सदा मिश्र ते गोडशा भावनांत ॥१॥

नसावें जगीं कांहिंही एकटें हें ।
मला वाटतें ईश्वरी सूत्र आहे ॥
विरावेंच एका जिवानें दुज्यांत ।
न कां मींहि तैसें तुझ्या जीवनांत ? ॥ २ ॥

( ५ ) ( अनुष्टुप् )

प्रेमभंगाहि शहाण—नको निष्प्रेम जीवन ।

( ५ ) ( शार्दूलविक्रीडित )

आधीं प्रेम करून पूर्ण जरि तें जाई पुढें भंगुन ।
तेंहि फार बरें ! परी नच मिळो निष्प्रेम तें जीवन ॥

( ६ ) ( भुजंगप्रयात )

मरावें निराशेंत मीं कां झुरोनी, ।
असे सुंदरी ती कुणी स्त्री म्हणोनी ? ॥

Or make pale my cheeks with care,
Because another's rosy are?
Be she fairer than the day,
Or the flowery meads in May,
*If she thinks not well of me,*
What care I how fair she be?

(7) (F. W. *Bourdillon*)

"Light of Love"

The night has a thousand eyes,
and the day but one,
Yet the light of the bright world dies
with the dying sun.

The mind has a thousand eyes,
and the heart but one,
Yet the light of the whole life dies—
when love is done.

(8) (*Franklin*)

He that falls in love with himself,
will have no rivals.

(9) (*La Rochefaucauld*)

Self love is the greatest of all flatterers.

(10)

Love is thorn that belongs
to the rose of youth.

(11) (*Stevenson*)

So long as we love, we serve.

No sister flower would be forgiven,
If it disdains it's brother !

And the sunlight clasps the earth,
And the moon-beams kiss the sea;
Whatever are these kissings worth
If thou kissest not me ?

(19) (*Butler*)

Love is a child by poets spoiled !

(20) (*Goss*)

Anger manifests itself in blows,
amusement in smiles,
Sorrow in tears & love in kisses.

(21) (*Topper*)

Love looks from the eyes
& kindles love by looking.

(22) (H*orace*)

Love is not a commodity to be bought&sold;
*It's only price is love !*

(23) (*Cornell*)

*When love is fully satisfied,*
all it's charm is gone !

(24) (*Shakespeare*)

Upon thy cheek I lay this zealous kiss
As seal to the indenture of my love.

---

मिळेना क्षमा कोणत्याही फुलास
जरी बंधुसाठीं तिरस्कार त्यास ।।
महीला मिठी घेइ सूर्यप्रकाश
समुद्रास चुंबील चंद्रप्रकाश ।।
परी मूल्य गे काय या चुंबनांचें
जरी तूं न घेशील माझ्या मुखाचें ? ।।

( १९ ) ( शार्दूलविक्रीडित )
लाडानें शिशु, तेविं प्रेमहि कवीलाडामुळें नासलें ।।

( २० ) ( अनुष्टुप् )
ठोस्यांनीं प्रकटे क्रोध । विनोदाहि स्मितांतुनी ।
प्रकटे शोक अश्रूंनीं । प्रेमही चुंबनांतुनी ॥

( २१ ) ( उपजाति )
नेत्रांतुनी प्रेम बघे, बघून । दे प्रीतिची ज्योतहि चेतवून ॥

( २२ ) ( अनुष्टुप् )
प्रीतीच मूल्य प्रीतीचें । मिळे ती, तीच देउनी ।
घेतां न विकतां ये ती । विकाऊ वस्तु मानुनीं ॥

( २३ ) ( शिखरिणी )
पुरे, होतां पूर्ति, प्रणयगत आकर्षण मनीं ॥

( २४ ) ( वसंततिलका )
स्वप्रेम लेख लिहिला हृदयीं तुझ्या मीं ।
मुद्रा तिथें करितसें दृढ चुंबनें मी ।।

———

## (16) Luck, Misfortune

(1) (*L. J. Bates*)

O, once in each man's life, at least,
Good luck knocks at his door;
And wit to seize the witting guest,
Need never hunger more !

(2) (*Shakespeare*)

Since you will buckle fortune on my back,
To bear the burden, whether I will or no,
I must have patience to endure the load.

(3) (*Omer Khayyam*)

The moving finger writes, and having writ,
Moves on, nor all your piety nor wit,
Shall lure it back to cancel half a line,
Nor all your tears wash out a word of it.

(4) (*Longfellow*)

" The Builder "

All are architects of fate,
Working in these walls of Time,
Some with massive deeds and great,
Some with ornaments of rhyme.

(समस्यापूर्ति)

(5) आर्येच्या तीन ओळी शेवटच्या ओळीला जुळत्या करून भाषांतरांत चार ओळींचा संपूर्ण श्लोक दर्शविला आहे.

" Man is the architect of his own fate."

## विभाग १६–सुदैव–दुर्दैव

( १ ) ( पृथ्वी )

निदान तरि एकदां मनुजजीवनीं येतसे ।
सुदैव कधि पाहुणा बनुनि दार ठोकीतसे ।।
असेल जर बुद्धि या धरुनि ठेवण्याची कुणा ।
तया भरणपोषणीं कधि विवंचना राहिना ।।

( २ ) ( स्रग्धरा )

ज्या अर्थी पृष्ठिं माझ्या, अवगणुनि मला, दैव तूं लादणार ।
त्या अर्थी भार तोही उचलुनि धरण्या धैर्य व्हावेंच थोर ।।

( ३ ) ( शार्दूलविक्रीडित )

जीवाचें भवितव्य, हस्त विधिचा जातो पुढें रेखुनी– ।
विद्वान् धार्मिक थोरही, खुलवुनी त्या दैवलेखांतुनी–।।
अर्धी ओळहि त्याकडून पुसुनी घेऊं शकेना कुणी ।
किंवा अश्रुजलें न शब्दहि कधीं जाईल हो वाहुनी ।।

( ४ ) ( फटका )

दैवाचे जणु शिल्पकारची जगिं या सारे जन दिसतीं ।
काळाच्या या भिंती त्यांच्या कार्यक्षेत्रासभोंवतीं ।।
शिल्प कुणी दाविती भव्य वा अवाढव्यशा कार्यांत ।
कलाकुसर ती दुसऱ्यांची हो अलंकारमय काव्यांत ।।

( समस्यापूर्ति )

( ५ ) ( शार्दूलविक्रीडित )

केलें जें गतजन्मिं कर्म, जधि ये तें पक्कसें होउन ।
त्यातें प्राक्तन, दैव, वा कुणि म्हणे प्रारब्ध, ऐसें जन ।।
कर्मांचा जगिं या प्रभाव अवघा, त्यावांचुनी दैव न ।
"दैवाचा जणुं शिल्पकारचि असे, जो तो स्वतांच्या जन" ।।

(6) (*Shakespeare*)

Will fortune never come
with both hands full?
But write her fair words
still in foulest letters?
She either gives a stomach & no food—
Such are the poor in health; or else a feast
And takes away the stomach—
such are the rich—
That have abundance—but enjoy it not!

---

## (17) Friend & Friendship etc.

(1) (*Shakespeare*)

Neither a borrower, nor a lender be;
For, a loan oft loses both itself
and friendship.

(2) (*Lord Bacon*)

The communication of man's self to a friend works two effects; for, it redoubleth joy, and cutteth griefs in halves.

(3)

A man is known, by the company he keeps.

(4)

Friendship is like a sheltering tree.

( ६ ) ( फटका )

दोन्ही अंजलि भरून न का सुदैव कधिंही येणार !
शुभ शब्दहि कां अशुभ अक्षरीं लिहीत नित्याचि मरणार ! ॥१॥

पोट देउनी–भूक देउनी, महाग करितें अन्नास
दुःस्थिति ऐशी सदैव देई धट्टयाकट्टया गरिबांस ! ॥ २ ॥

समृद्धि असुनी भोगूं शकती कधीं न ती, जे ऐश्नांस
रुचिही नसुनी पक्वान्नांचें भोजन घाली धनिकांस ॥ ३ ॥

---

## विभाग १७–मित्र, स्नेह, शत्रु, वैर.

( १ ) ( फटका )

मित्रामित्रांमधें कधींही ऋणको, धनको बनूं नये ।
बहुधा मैत्री, धनही बुडतें; केवळ कटुता कपाळिं ये ॥

( २ ) ( प्रहर्षिणी )

मित्राशीं हृदय खुलें जधीं करावें ।
एकाचे परि परिणाम दोन व्हावे ॥
आनंदा द्विगुणित तें सदा करील ।
अर्धेंहि पुढति न दुःख तें उरेल ॥

( ३ ) ( स्रग्धरा )

मित्राच्या पात्रतेनें, जगति ठरतसे योग्यता मानवाची ।

( ४ ) ( उपजाति )

वृक्षात जैसें घरटें खगाचें । मित्रत्व हें आश्रय मानवाचें ॥

(5)

A friend exaggerates man's virtues,
An enemy, his crimes.

(6)

A friend in need,
Is a friend indeed.

(7) (*Henry Austin Dobson*)

But friendship is a nobler thing—
Of friendship it is good to sing.
For truly, when a man shall end
He lives in a memory of his friend,
Who does his better part recall
And of his fault make funeral.

(8) (*Noble*)

There is not so much danger from a known foe, as a suspected friend.

(9) (*Bacon*)

No man imparteth his joy to friends
but he joyeth the more.
No man imparteth his grief to friends
but he grieveth the less.

(10) (*Aristotle*)

Friendship is one mind in two bodies.

(11) (*Kingslay*)

It is only the great hearted
who can be true friends.
The mean & coward can never know
what *true friendship* is.

( ५ ) ( व. ति. )

सन्मित्र तो अतिशयोक्ति करी गुणांची :
शत्रू तशीच करितो, परि दुष्कृतींची ॥

( ६ ) ( इंद्रवज्रा )

धांवोनि जो येईल संकटांत ।
तोची खरा मित्र असे जगांत ॥

( ७ ) ( शा. वि. )

" मैत्री " ही परि गौरवास्पद किती (कीर्तींहुनी) वाटते ।
मैत्रीचें गुणगान वास्तव सदा आहे हिताचेंच तें ॥
जातां मानव वाटतें जरि तुम्हां तो नष्ट झाल्यापरी ।
राहे तो स्मरणीं जिवंतचि खरा मित्रांचिया अंतरीं ॥१॥
जें जें उत्तम त्यांत, तें जपुनिया त्याची स्मृति ठेविती ।
जे जे दोष तयांतले सकल ते प्रेतासवें जाळिती ॥२॥

( ८ ) ( अनुष्टुप )

ज्ञात शत्रुहुनी नित्य भयप्रद कितीतरी ।
स्वतःचा मित्रही—वाटे संशयास्पद तो जरी ॥

( ९ ) ( व. ति. )

मित्रास मोद अपुला न कुणीहि देतो । तेणें परी मुदित हाच विशेष होतो ॥
मित्रा स्वदुःखहि तसें वितरी न कोणी । तेणें कधीं न घडतां निज दुःखहानि ॥

( १० ) ( शा. वि. )

देहीं दोनहि, चित्त एक असणें या नाव मैत्री खरी ॥

( ११ ) ( उपजाति )

ज्याच्या महत्ता हृदयीं असेल । मैत्री खरी तोच करूं शकेल ।
जो क्षुद्र अन् भेकडही मनानें । सन्मित्रता-अर्थ कधीं न जाणे ॥

(12) (*Addison*)

*Our friends do not see our faults;*
If they do, conceal or soften them.

(13) (*Ellis*)

Friends should be like a coin, tested *before*
being required; and not found faulty
in our need.



## (18) Poet, Literature, word, Education.

(1)

" We are the music makers "

We are the music makers,
And we are the dreamers of dreams,
Wandering by lone sea-breakers
And sitting by desolate streams-

World loosers and world forsakers
On whom the pale moon gleams;
Yet we are the movers and shakers
Of the world forever, it seems.

With wonderful deathless ditties
We build up the world's great cities,
*And out of the fabulous story*
We fashion on empire's glory.

(१२) (व. ति.)

सन्मित्र दोष न कधीं अमुचे पहाती ।
पाहून, झांकतिल वा हलके करीती ।।

(१३) (शा. वि.)

खोटें तें न ठरो, प्रसंगि म्हणुनी, नाणेंहि घेतों जसें—
आधीं पारखुनी, स्वमित्र मनुजें जाणोनि घ्यावे तसे ।।

---

## प्रकरण १८–कवि, लेखक, वाङ्मय, शब्दसामर्थ्य, शिक्षण.

(१) (शार्दूलविक्रीडित)

" आम्ही कोण म्हणूनि काय पुसता ! "

आम्ही मंजुळ गोड गोड असलीं गीतें सदा निर्मितों ।
विश्वांतील विशाल भव्य अवघीं स्वप्नें तशीं पाहतों ।।
लाटा त्या फुटती तिथें भटकतों एकांत अब्धीचिया ।
ओसाडींतिल निःशांतिक गमे आनंद चाखावया ।।१।।

आम्ही हें जग जोडि;—त्याग करितों आम्हीहि त्याचा तसा ।
चंद्राचा पडतो प्रकाश जरि तो अस्पष्ट अस्पष्टसा ।।
वाटे ही गतिमानता जगति या आम्हांमुळें येतसे ।
आम्ही संतत गद्गदा हलवितों साऱ्या जगाला तसें ।।२।।

सोप्या, विस्मयकारि नी अमर या गीतांचिया साधनीं ।
मोठालीं नगरें जगामधिल हीं देतों अम्ही बांधुनी ।।
ऐशा कांहि कपोलकल्पित नव्या वार्ता रचोनि पहा ।
साम्राज्यासम देतसूं उभवुनी हीं येथवेरी महा ।।३।।

One man with a dream at pleasure
Shall go forth and conquer a crown;
And three with a new song's measure
Can trample a kingdom down.

We, in the ages lying
In the buried past of the earth,
Built Nineveh with our sighing
And Babel itself in our mirth.

And overthrew them with prophesying
To the old, of the new world's worth;
For each age is a dream that is dying,
Or one that is coming to birth.

*A breath of our inspiration*
Is the life of each generation;
A wondrous thing of our dreaming
Unearthly impossible seeming—

The soldier, the king and the peasant,
Are working together in one
Till our dream shall become their present
And their work in the world be done.

They had no vision amazing
Of the goodly house they are raising;
They had no divine foreshadowing
Of the land to which they are going;

But on one soul it hath broken
A light that doth not depart
And his look, or a word he hath spoken
Wrought flame in another man's heart.

मोठी मौलिक स्वप्नसृष्टि नयनीं पाहूं शके जो कुणी ।
स्वेच्छेनें किरिटांस घेऊं शकतो एकाकिही जिंकुनी ॥
ऐसे तीन कुणीहि मानव नव्या काव्यामधें रंगुनी ।
होती शक्तचि टाकण्या पदतलीं राज्यासही खेचुनी ॥४॥

मेलेल्या गतकालिं भूमिगत, हें आम्ही जगीं राहुनी ।
केलें कार्य किती प्रचंड असलें ठेवा तुम्ही देखुनी—॥
मोठे ताजमहाल शोक करुनी आम्हींच ते बांधले ।
बुद्धाचे किति सारनाथ अमुच्या हर्षांतुनीं जन्मले ॥५॥

"आहे श्रेष्ठ तुम्हांहुनी जग नवें" जीर्णास हें सांगुनी ।
उच्चारून भविष्य, जीर्ण जग तें देतों अम्ही ध्वंसुनी ॥
होती सर्व युगांत स्वप्न मरतें, त्याच्या तरी यातना ।
किंवा स्वप्न नवेंच जें जनन घे, त्याचा हले पाळणा ॥६॥

स्फूर्तीयुक्त अशा हळूहळु अम्ही जो घालितों फुंकर ।
तो प्रत्येक पिढीस जीवद ठरे चैतन्यदायी वर ॥
शक्यातीत तथा अनैहिक असें वाटे जरी हें मना ।
स्वप्नें हीं अमुचींच विस्मयकरी देती पहा प्रेरणा—॥७॥

सारे सैनिक, भूप, शेतकरि ते एका जिवानें किती ।
जाती कष्ट करूनिया (न कळता) एकाच ध्येयाप्रती ॥
प्रत्यक्षातचि येइ स्वप्न अमुचें त्यांच्या तदा जीवनीं ।
यात्रा ते इहलोकिं पूर्ण करिती साफल्य हें लाभुनी ॥८॥

त्यानीं मंदिर थोर जें उभविलें सोसुनिया यातना ।
त्याची विस्मयकारि भव्य नव्हती त्यांना मुळीं कल्पना ॥
होते जात स्वकीय-कर्म-विभवें ज्या पुण्यभूमीस ते ।
तीचें दिव्य न पूर्वदर्शन घडे त्यांच्या कधीं दृष्टितें ॥९॥

तत्कालीन कुणातरी प्रमुखशा एकाचिया अंतरीं ।
केव्हांही न विझे अशी उजळते ती दिव्य ज्योती परी ॥
त्याचा दृष्टिनिपात एक, मुरलीचा तो स्वरही एक वा ।
रस्त्यांचा उजळील दीपक दुरीं अस्पष्टसा तो नवा ॥१०॥

And therefore today is thrilling
With a past day's late fulfilling;
And the multitudes are enlisted
In the faith that their fathers resisted.

And scorning the dream of tomorrow
Are bringing to pass as they may,
In the world, for its joy or its sorrow
The dream that was scorned yesterday.

(2) (*Pope*)

Words are like leaves; and where they most abound,
Much fruit of sense beneath is rarely found.
False eloquence, like prismatic glass,
Its gaudy colours spreads on every place;

The face of nature we no more survey,
All glares alike, without distinction, gay;
But true expression, like the unchanging sun,
Clears and improves whate'r it shines upon.

(3) (*Ovid*)

Art lies in concealing art.

(4) (*Seneca*)

All art is but an imitation of nature.

(5) (*T. B. Aldrich*)

What is lovely never dies.
But passes into other loveliness.

गेलें सिद्धिस कालच्याच दिवशीं, पोटांत ठेवूनि तें ।
झाली गर्भवतीच वेळ शुमदा ही आजची वाटते ॥
गेले पूर्वज ते विरोध करिती यापूर्वि तत्त्वास ज्या ।
झुंडींनीं अनुयायि आज बनली त्यांचीच सारी प्रजा ॥११॥

श्वःकालीन तशींच आज जन हे स्वप्नें तिरस्कारिती ।
जें जें ज्यास जमेल तेंच करूनी सारे परी कष्टती–॥
त्याच्या दुःखसुखासवें जगतिं या मूर्तत्व त्या द्यावया ।
जे मानीत तिरस्कृतासम, अशा स्वप्नांसची कालच्या ॥१२॥

( २ ) ( शार्दूलविक्रीडीत )

पर्णांच्यासम शब्द होत; दिसते गर्दी तयाची जिथें ।
अर्थाचें फल फारसें न सहसा येईल हातीं तिथें ॥
जैसे भ्रामक शब्दजाल पसरी वक्तृत्व खोटें जनीं ।
देतो लोलक रंग ते भडकची सर्वत्र फैलाउनी ॥१॥

होती सर्व पदार्थ मूळ अपुल्या रूपास ते पारखे ।
सारे भेदविना समान झळके तेणें दिसे सारखें ॥
अर्थव्यक्ति खरीखुरी, स्थिर अशा त्या सूर्यतेजापरी ।
वस्तू शुद्ध करी, सुधारिहि तिला ही ती पडे ज्यावरी ॥२॥

( ३ ) ( भु. प्र. )

खरी कला–जी लपवी कलेतें ।

( ४ ) ( भुजंगप्रयात )

निसर्गानुसारीच सारी कला ती ।

( ५ ) ( उपेंद्रवज्रा )

कधीं न सौंदर्य मरोनि जातें ।
विरे दुणा सुंदरतेतची तें ॥

(6) (R. *Browning*)

If you get simple beauty and naught else,
You get about the best things God invents.

(7) (*Keats*)

Beauty is truth and truth is beauty.

(8) (*Tennyson*)

I sometimes hold it half a sin,
To put in words the grief I feel
For words, like nature, half reveal,
And half conceal the soul within.

(9)

Expression is the dress of thought.

(10)

A poet is born, and not made.

(11) (*R. W. Gilder*)

" Give me a theme ", the little poet cried,
" And I will do my part; "
" 'Tis not a theme you need, "
the world replied
" you need a heart. "

(12) (*A. J. Ryan*)

When falls the soldier brave,
Dead at the feet of wrong,
The poet sings and guards his grave,
With sentinals of song.

( ६ ) ( शार्दूलविक्रीडित )

साध्या सुंदरतेविना न दुसरें कांहीं मिळालें जरी।
लाधे कल्पलतेवरील विधिच्या ती साजिरी मंजिरी ॥

( ७ ) ( शार्दूलविक्रीडित )

यावे सुंदरतेत सत्यहि, तसें सत्यांत सौंदर्यही।

( ८ ) ( भुजंगप्रयात )

कधीं वाटतें अर्थ हें पाप आहे।
वदे शब्दरूपेंच दुःश्वास मी हें ॥
निसर्गापरी, शब्दही, अर्थ झांकी।
'खरा भाव' अर्थाच तो दावितो कीं ॥

( ९ ) ( शार्दूलविक्रीडित )

अर्थव्यक्ति जणूं विचारशरिरीं वस्त्रापरी शोभते।

( १० ) ( मालिनी )

उपजतचि असावी लागते काव्यशक्ति।
खटपट करूनीही येत नाहीं कधीं ती ॥

( ११ ) ( पृथ्वी )

कविब्रुव कुणी वदे, "विषय द्या मला हो कुणी–।
सुकाव्य करतों पहा तर खरें कसें सद्गुणी" ॥
वदे जग, "तुला नसे विषय; ही न वस्तुस्थिति।
खरी उणिव रे तुला रसिकता नसे हीच ती" ॥

( १२ ) ( स्रग्धरा )

अन्यायी राक्षसाच्या यदि मरुनि पडे शूर जेव्हां लढोनि।
नच्छी त्याच्या स्मृतीतें कविजन परि तो त्यास गावोनि गाणीं ॥

(13) (*William Caxton*)

There is a time of speaking,
And a time of keeping silence.

(14) (*James Thomson*)

Singing is sweet, but be sure of this—
Lips only sing, when they cannot kiss.

(15) (*Nathalia Crane*)

The little " AND " and the tiny " IF, "
The ardent " AHs ! " and " OHs; "
They haunt the lanes of poesy
And the boulevards of prose.

(16) (*Anna H. Branch*)

God wove a web of loveliness,
Of clouds and stars and birds,
But made not anything at all
So beautiful as words !

(17) (J. C. *Ransom*)

God ! have mercy on the sinner
Who must write without a dinner,
No belly and no bowels
Only consonents and vowels !

(18) (*Prior*)

Let him be kept from paper, pen and ink,
So he may cease to write
and learn to think !

( १३ ) ( भुजंगप्रयात )

जधीं बोलण्याची असे योग्य वेळ।
तधीं मूक होण्याविहीं कां नसेल!

( १४ ) ( शार्दूलविक्रीडित )

आहे गायन गोड तें, परि मनीं हें जाण तूं निश्चित।
गाती तोंवरि ओष्ठ, जोंवरि न ते घेती मुक्याचें मत ॥

( १५ ) ( शिखरिणी )

कुठें छोटासा "अन्" बघ चिमुकले ते "जरि तरी"।
"अहा" उत्साहाचा, "अहह" रडवें तें मुख करी ॥
सुतें हीं शब्दांचीं किति "कवन-गल्लींत." घुसतीं।
सुमार्गी 'गद्याच्या' नगरिंतहि यांचीच भरती ॥

( १६ ) ( वसंततिलका )

गुंफीत देव किती सुंदर जाल साचें।
त्या तारका, घन, तसे उडत्या खगांचें॥
निर्मावयास शकला अजुनी न तोही।
शब्दांसमान अतिसुंदर वस्तु कांहीं॥

( १७ ) ( भुजंगप्रयात )

करावी दया देव! या पापियाला।
लिही हा, मिळेना जरी खावयाला॥
नसे पोट यातें; न वा आंतडेंही।
स्वराव्यंजनावांचुनी नान्य कांहीं॥

( १८ ) ( भुजंगप्रयात )

क्षणीं हस्त बांधी नव्या या कवीचे।
मिळूं द्या न साहित्य त्या लेखनाचें॥
तरी लेखना हा पुढें यांवरील।
मनीं अन् विवेका कराया शिकेल॥

(19) ( H. W. *Longfellow* )
The Arrow and the song

I shot an arrrow into the air,—
It fell to the earth, I know not where;
For so swiftly it flew, the sight,
Could not follow it in its flight !

I breathed a song into the air,-
It fell to the earth, I know not where;
For who has sight so keen and strong,
That it can follow the flight of song ?

Long, long, afterwards in the oak,
I found the arrow, still unbroke;
And the song, from begining to end,
I found again, in the heart of a friend !

(20)

True ease in writing comes from art, not chance
As those move easiest, who have learnt to dance.

(21)

What sculpture is to a block of stone
So is good education to the soul.

(22)

Satire should, like a polished razor keen
Wound with a touch, that is scarcely felt or seen.

(23)

Language should be the mirror of mind.

( १९ ) ( पृथ्वी )

कुठेंतरि, हवेमधें, उगिच बाण मीं सोडला ।
कुठें पडत जाउनी, नच कळे तदा तें मला ॥
असा जलद जातसे उडत, कीं, तया मागुती ।
अशक्य पळणें असे त्वरितगामि दृष्टीप्रती ॥ १ ॥

दिलें उडवुनी तसें मधुर गीत वायूवरी ।
मला न दिसलेंच तें पडतसे कुठें भूवरी ॥
अशी सबल सूक्ष्म दृष्टिहि जगीं कुणा कां असे ।
सुगीत-गतिनेंच जी उडत मागुती जातसे ? ॥ २ ॥

दिसे मजसि बाण तो बहुतकाल गेल्यावर ।
अखंडचि असा बसे रुतुनि एक वृक्षावर ॥
तसेंच गवसे पुन्हां मधुर गीत साद्यंतसें ।
अजूनहि कुण्या सुमित्रहृदयांतरीं जें वसे ॥ ३ ॥

( २० ) ( शार्दूलविक्रीडित )

ये सौकर्य यदृच्छया नच; कलायोगें खरें लेखनीं ।
लालित्यें युत चाल त्यासच मिळे, जो नृत्य घे जाणुनी ॥

( २१ ) ( शार्दूलविक्रीडित )

शिल्पानें जडहीं शिलेंतुन निघे देवत्व जैसें मलें ।
मातींतून तशी निघे मनुजता सच्छिक्षणाच्या मुळें ॥

( २२ ) ( स्रग्धरा )

वाणी ती औपरोधी चकचकित जणूं वस्तऱ्याचीच धार ।
येईना तें कळोनी, दिसत न, जरि ही कापुनी ठेवि फार ॥

( २३ ) ( उपजाति )

भाषा असो दर्पणरूप व्हावी । मनस्थिती त्यांत पुरी दिसावी ॥

(24)

Give everyman thy ear, but few thy voice.

(25)

Speech is silvern, but silence is golden.

(26)

True wit is Nature to advantage dresst,
What oft was thought but ne'er so well
expresst.

(27)

Vision is the art of seeing things invisible.

(28) (*Samuel Wesley*)

The Poet's Fate is here in emblem shown,
He asked for bread—and he recieved a
stone!

(29) (*Mathew Arnold*) (About Shakespeare)

Others abide our question; thou art free!
We ask and ask—thou smilest and art still,
Out topping knowledge! so some
sovereign hill
Who to the stars, uncrowns his majesty—
Planting his steadfast footsteps in the sea
Making the heaven of heavens his
dwelling place

( २४ ) ( शार्दूलविक्रीडित )

सर्वांचें जरि ऐकणें, परि असो थोड्यांस संभाषण ।

( २५ ) ( पृथ्वी )

जरी रजतमूल्य भाषण सुवर्णची मौन तें ॥

( २६ ) ( शार्दूलविक्रीडित )

वस्त्रांचें चढवीं विभूषण खरी कोटी निसर्गावरी ।
जें सुव्यक्त असें न होत अजुनी, राहे जरी अंतरीं ॥

( २७ ) ( भुजंगप्रयात )

दिसे जें न लोकांस तें पाहण्याची ।
कला, जी असे दिव्यदृष्टीच साची ॥

( २८ ) ( शार्दूलविक्रीडित )

पर्यायें विधिलेख हाचि कविचा, वाटे इथें चित्रिला ।
याची अन्नचि एक घासभर जो-त्याला मिळाली शिला ॥

शेक्स्पीयरच्या काव्याची खोली व उंची समजणें आम्हां पामरांच्या आवांक्याबाहेर आहे. त्याचें शिखर केवळ तान्यांनाच दिसूं शकतें. हे महाकवे ! आम्ही मर्त्य, तुझ्या पायाजवळ अल्पशा सीमाप्रांताचेंच फक्त दर्शन घेऊं शकतों.

( २९ ) ( शार्दूलविक्रीडित )

प्रश्न अंकित अन्य सर्व कविते,–तूं मुक्त रे संतत !
प्रश्नामागुनि प्रश्न आम्हि करितों,–निःशब्द तूं सस्मित ॥
ज्ञानातीत ! उभा जणूं गिरिचिया उत्तुंग शृंगापरी ।
शीर्षाच्या निजवैभवास उघडें तान्यांपुढें जें करी ॥ १ ॥

अब्धीमाजि पदांस सुस्थिर असा राहे उभा रोवुनी ।
स्वर्गोच्याहिवरी निवास अपुला तू राहसी बांधुनी ।

Spares but the border, often of his base
To the foiled searching of mortality,
And thou, whose head did star and
sunbeams know,
Didst walk on earth, unguessed at–

(30) (*Austin Dobson*)

All passes !—art alone—enduring
stays to us,—
The bust outlasts the throne,—
the coin, Tiberius.

(31) (*Robinson Jeffers*)

The beauty of things was born before eye,
And sufficient to itself;
The heart-breaking beauty will remain,—
When there is no heart to break for it.

(32) (*Bacon*)

Some books are to be tested,
others to be swallowed,—
and some few to be chewed and digested.

(33) (*Stafford Brooke*)

Writing is not literature, unless it gives to the reader a pleasure, which arises not only from what is said but how it is said; such pleasure is only given when the words are carefully, curiously or beautifully put together in sentences.

सीमाप्रांताचि पायथ्यानवळचा देतोस तूं सोडुनी ।
मर्त्यांला, जणुं, "शोध व्यर्थ करुं दे" ऐशी दया येउनी ॥२॥

ज्याचें मस्तक सूर्य, तारक–विना कोणींच ना पाहिलें ।
त्याची या जगता अकल्पित अशीं हीं लागलीं पाउलें ॥

( ३० ) (फटका)

सारें जाई,–कला एकली जिवंत राही चिकाटिनें ।
गेला राजा, राज्यहि !–उरलें मूर्ति आणखी तें नाणें ॥

( ३१ ) (फटका)

नेत्र जन्मले नव्हते जेव्हां, कौतुक करण्या सृष्टीचें ।
स्वयंपूर्ण सौंदर्य वस्तुचें–आहे तेव्हांपासुनचें ॥ १ ॥
हृदयभंग तो होई ज्याचा, ते नर झाले नष्ट जरी ।
हृदयभंग जे करूं शके तें उरेल जगिं सौंदर्य परी ॥२॥

( ३२ ) (फटका)

सर्व पुस्तकें नसति सारखीं–कांहीं केवळ चाखावीं ।
गिळावि कांहीं–परंतु थोडीं चावुनि खाउनि पचवावीं ॥

( ३३ ) (उपजाति)

न ज्यामधें वाचक रक्षकत्व । पावे न तें लेखन वाङ्मयत्व ।
न वस्तुनें केवळ मोद व्हावा । शैलीतुनींही रस पाझरावा ॥
सुचिन्तनें जे वच सुप्रयुक्त । वैचित्र्य वा प्रासपणेंहि युक्त ।
वाक्यें अर्थांतुनच गुंफिती हीं । आनंददायी रसिकांस होतीं ॥

(34) (*Life of Milton*)

Poetry is the art of uniting pleasure with truth by calling imagination to the help of reason !

(35) (*Kingslay*)

A boy may fly a kite and haul it in, but that can't be done when are flying words.

(36) (*Ceravantes*)

Proverbs are short sentences drawn from long experience.

(37) (*Burke*)

The greatest of all mischiefs that vex the world, arises from words; people soon forget meaning, but the impression & passion remain!

(38) (*Cotton*)

There are three difficulties in authorship—

(1) To write something worth publishing;
(2) To get honest men to publish it;
3) Have sensible men to read it !

( ३४ ) ( व. ति. )

देण्यास साह्य अतिदक्ष विवेक यास ।
बोलावुनी ललित कोमल कल्पनेस ॥
आनंद, सत्य, उभयांस करील एक ।
ऐशा कलेस कविता म्हणतात लोक ॥

( ३५ ) ( पृथ्वी )

पतंग उडवी, नि घे शिशु पुनश्च गुंडाळुनी
न शक्य तसलें, उडेल जधिं शब्द तोंडातुनी ॥

( ३६ ) ( द्रुतविलंबित )

अनुभवाब्धि विशालचि मंथुनी ।
अमृत अल्प निघे जणुं त्या 'म्हणी' ॥

( ३७ ) ( व. ति. )

होतात तापकर जे जगमानसांत ।
त्यांच्यांत शब्दकृत तेच महा अनर्थ ॥
शब्दांतला विसरती क्षणिं लोक अर्थ ।
तज्जन्य भाव नि ठसा उरतो मनांत ॥

( ३८ ) ( व. ति. )

व्हावें प्रकाशित असें लिहिणार काय ।
ऐसा प्रकाशक तयास मिळेल काय ॥
होता प्रकाशितहि वाचति कोण शते ।
या तीन हो अडचणी कवि लेखकांतें ॥

किंवा

प्रसिद्ध करण्यास योग्य असलें लिहावें कसें, ।
प्रकाशक तया कुठून मिळतील सच्चे असे ॥
प्रसिद्ध करतां रसज्ञ-जन त्यास वाचील कां ।
अशा त्रिविध घोर या अडचणी सदा लेखकां ॥

(39) (*Confucious*)

By keeping silence when we ought to speak
men may be lost;
By speaking when we ought to be silent,
we waste our words.
A wise man is careful to do neither,
There is a time to speak and a time
to be silent.

(40) (*Young*)

Unlearned men, of books, assume as
much care
As eunuchs—guardians of the fair.

(41) (*Cecero*)

Men are born poets but become orators.

(42) (*Johnson*)

None can be a good poet without first being a good man.

(43) (*Oken*)

Two sorts of writers possess genious !
Those that think, & those that make you think.

---

(३९) (पृथ्वी)

अवश्य वदणें तिथें ठरत घातकी मौन तें
वदों, जिथ अवश्य मौन, तरि शब्द वायां तिथें ॥
परी उभय हानि, सुज्ञ कृतिनेंच टाळीतसे
सदा उचित वेळ भाषण नि मौन यांची असे ॥

(४०) (अनुष्टुभ)

अशिक्षित, सदा ग्रंथां इतुके जपतील कीं—
अंतःपुरास रक्षाया योजिले जणुं कंचुकी ॥

(४१) (उ. जा.)

कवित्व जन्मासह प्राप्त होतें । वक्तृत्व अभ्यास करून येतें ॥

(४२) (उ. जा.)

आधीं नसे ज्या सुजनत्व त्यातें । कधीं न लोकीं सुकवित्व येतें ॥

(४३) (अनुष्टुभ)

प्रतिभावंत लोकीं या द्विविध ग्रंथकार ते
विचार करिती जे अन् कराया लावतात ते ॥

## (19) Peace, Contentment

### (1) (*Thomas* Lovell *Beddoes*)

### " Dream—Pedlary "

If there were dreams to sell,
What would you buy ?
Some cost a passing bell,
Some, a light sigh—
That shakes from life's fresh crown,
Only a rose leaf down.
If there were dreams to sell,
Merry and sad to tell,
And the crier rang the bell,
What would you buy ?
" A cottage lone and still,
With bowers nigh,
Shadowy, my woes to still,
*Untill I die.* "
Such pearl from life's fresh crown
Fain would I shake me down,
Were dreams to have at will,
This would best heal my ill.

### (2) (*Goldsmith*)

Ill fares the land to hastening ills a prey,
Where wealth accumulates and men decay,
Princess and lords may flourish or may fade
A breath can make them, as a breath has made :
But a bold peasantry their country's pride

## प्रकरण १९ शांति, तृप्ति, समाधान.

( १ ) ( उपजाति )

स्वप्नें जरी येति विकावयाला ।
घेणार तुम्ही कसलीं स्वतांला ? ॥
असे कुणी स्वप्नहि मृत्युगोल ।
निःश्वास हें मूल्य कुणा पुरेल ॥
ताज्या, जिवाच्या मुकुटामधून ।
घेउं शके पानचि जो खुडून ॥ १ ॥

स्वप्नें जरी येति विकावयाला ।
सुखी तशी दुःखिहि सांगण्याला ।
घंटा अशीं वाजवि फेरिवाला ।
घ्यावें कसें स्वप्न तुम्हां स्वतांला ॥ २ ॥

एकाकिनी पर्णकुटी निवांत ।
असो लताकुंजहि अंगणांत ॥
समोंवतीं शीतल शांत छाया ।
आजीव दुःखें मम शांतवाया ॥
ताज्या किरीटांतुनि जीवनाच्या ।
घेईन हें मौक्तिक तोडुनीया ॥
मागीन तें स्वप्न जरी मिळेल ।
दुःखास ऐसें मज हें पुरेल ॥ ३ ॥

( २ ) ( शा. वि. )

येई त्या कुदशा; स्वरेंच विपदांचा मस्करी टो घने ।
संपत्ती नरि सांडते-जन मरे ज्या देशि अभावेंनें ॥
राजे तेथें धनाढ्य ते सकलही वाटोत नाशोत वा ।
देशा येईल जन्म त्यां पुनरपि निःश्वासमार्गें नवा ॥ १ ॥

When once destroyed, can never be supplied.
A time there was, ere England's grief began
When every rood of ground maintained its man.
For him, light labour spread its wholesome store
Just gave what Life required; but gave no more.
His best companions, innocence and health,
His best riches, ignorance of wealth.

( 3 ) ( *Goldsmith* )

As some lone miser, visiting his store,
Bends at his treasure, counts, recounts it o'er,
Hoards after hoards his rising raptures fill
Yet still he sighs for hoards are wanting still!
Thus to my breast, alternate passions rise,
Pleased with each good that Heaven to man supplies;
Yet oft a sigh prevails, and sorrows fall,
To see the hoard of human bliss so small,
And oft I wish, amidst the scene, to find,
Some spot to real happiness consigned,
Where my worn soul, each wanderiug hope to rest,
May gather bliss to see my fellows blest.

धैर्यानें आपुल्या कृषीवल सदा देशास जो भूषण ।
होतां नष्टचि, वाण ती भरुं शके त्याची कुणी अन्य न ॥
होता काळ अशा–दशा नव्हति ही देशास आली तदा ।
अल्पक्षेत्रहि भूमिचें निजधन्या पोशीत होतें सदा ॥ २ ॥

होती लाभत तुष्टि पुष्टि सुख तें थोड्याहि कष्टांमुळें ।
जीवावश्यक तेवढेंच; परि ना आधिक्य त्यातें मिळे ॥
निष्पापत्व निरामयत्वचि तया होते खरे बांधव ।
संपत्तीविषयीं अजाण असणें हेंची खरें वैभव ॥ ३ ॥

( ३ ) ( शा. वि. )

एकांतीं धनसंचया कृपण तो जाई पहाया कुणी ।
जैसा चांकुनिया पुनः पुनरपि त्या पाहतो मोजुनी ॥
राशीमागुनि राशि देखुनि मनीं आनंद दाटे जरी ।
तृप्ती त्या तिळक्या धनें न मिळतां निःश्वास टाकी तरी ॥ १ ॥

एकाआड विरोधि येतचि अशा माझ्या मनीं भावना ।
देई ईश्वर मानवा सुख, तयें आनंद दाटे मना ॥
होई दुःख परी, मधूनचि उठे निःश्वासही मन्मनीं ।
आहे अल्पचि मानवीं सुख किती जाणीव ही होउनी ॥२॥

वेडी आस, अशा स्थळास पहाण्या, केव्हातरी लागते ।
नाहीं दुःख जिथें, खरें सुख सदा, जेथें असा नांदतें ॥
विश्रांती, थकल्या जिवा; भटकत्या आशांसही लाभुनी ।
जेथें बंधु सुखीच सर्व बघुनी मी धन्य होई मनीं ॥ ३ ॥

(4) (*Cowper*)

Oh! for a lodge in some vast wilderness!
Some boundless contiguity of shade,
Where rumour of oppression and deceit,
Of unsuccessful or successful war,
Might never reach me more! my ear is pained!
My soul is sick with everyday's report,
Of wrong and outrage with which the earth is filled.
There is no flesh in man's obdurate heart—
It does not feel for man; The natural bond
Of brotherhood is sever'd as the flax,
That falls asunder at the touch of fire.
He finds his fellow guilty of a skin,
Not coloured his own and having power,
To enforce the wrong, for such a worthy cause,
Dooms and devotes him as his lawful prey.
Lands intersected by a narrow firth,
Abhore each other. *Mountains interposed*
Make enemies of the nations who had else
Like kindred drops been mingled into one.

(5) (*Green*)

Sweet are the thoughts, that savour of content—
The quiet mind richer than the crown;
Sweet are the nights in ceaseless slumber spent—
The poor estate scorns fortune's angry frown.

(४) (फटका)

किती वाटतें ! वसति कराची अफाट ऐशा रानांत ।
अखंड छाया जिथें पसरली, जिचा दिसेना मुळिं अंत ॥ १ ॥
कोणीं छळलें, कुणीं फसविलें, हरलें, जितकें युद्ध कुणी ।
कर्णकटु या वार्ता जेथें कधीं न पडतीलचि कर्णी ॥ २ ॥

× × ×

मम आत्म्याला घृणा वाटते, प्रतिदिवशीं हें ऐकून–।
कीं "अन्यायें अत्याचारें जगत टाकिलें व्यापून" ॥ ३ ॥
हट्टी हेकट मानवहृदयीं मायाममता मुळीं नसे ।
एका मनुजा दुसऱ्यासाठीं प्रेम न कांहीं वाटतसे ॥ ४ ॥

निसर्गनिर्मित बंधुत्वाचे बंध गळोनि पडतात ।
अग्निस्पर्शें धागे जैसे तटातटा ते तुटतात ॥ ५ ॥
दुज्या कुण्या बंधुच्या त्वचेचा रंग स्वतःसारखा नसे ।
तरी बंधु हा, त्या बंधूला महदपराधी मानितसे ॥ ६ ॥
अन्यायीं सामर्थ्य वापरी पवित्र या कार्यी नर तो ।
इकाचें तें भक्ष्य मानुनी, गुलाम त्यातें हा करतो ॥ ७ ॥
निरुंद खाडी, पर्वत, मध्यें; निमित्त इतुकें हेंचि पुरे ।
समान सीमा, संस्कृति असुनी राष्ट्रें बनतीं शत्रु खरे ॥ ८ ॥
समद्रवाच्या बिन्दुसम जेथें विलीन व्हावें परस्परा ।
चोजारी हे एक दुज्याचे गळे कापिती चराचरा ॥ ९ ॥

(५) (शार्दूलविक्रीडित)

वृत्तीच्या रुचिनें विचार बनती ते गोड सारे मनीं ।
मोठें वैभवशालि शांत मन हें वाटे किरीटाहुनी ॥
निद्रा शांत, अखंड येइल तया, रात्री सुखाच्या किती ।
कोपिष्ठा–धनदौलतीस गरिबी भक्ता तिरस्कारि ती ॥ १ ॥

Such sweet content, such minds, such sleep,
such bliss,
Beggers enjoy, when princes oft *do miss*,
Obscured life sets down a type of bliss;
A *mind content* both *crown* and kingdom is.

(6)

The seas are quiet,
when the winds *give o'ver*,
So calm are we,
when passions are no more—
For then we know, how vain it was to boast,
*Of fleeting things, too certain to be lost.*
Clouds of affection from our younger eyes,
Conceal that emptiness which age descries,
The soul's dark cottage, battered & *decayed*
Lets in new light through chinks
that Time has made.
Stronger by weakness, wiser men become,
As they draw near to the eternal home;
Leaving the old, both worlds at once
they view,
That stand upon the threshold of the new.

(7) (*Joseph Campbell*)

As a white candle,
In a holy place,
So is the beauty,
Of an aged face,
As the spent radiance
Of the winter sun,

तृप्ती गोड अशी, असें मन, अशी निद्रा, असें सौख्यही ।
राजांनाहि कधीं कधीं न मिळतें, लाभे भिकाऱ्यासही ॥
सौख्याचा सुविशेष येत दिसुनी अज्ञातशा जीवनीं ।
वाटे राज्य–किरीट–तुल्यवल ती तुष्टी नराच्या मनीं ॥२॥

( ६ ) ( शार्दूलविक्रीडित )

जातां वादळ तें निघोनि उदधी होई प्रशान्त स्वयें ।
तैसे क्षोभद ते विकार शमतां, या मानसा शांति ये ॥
ज्याचा निश्चित नाश, चंचल, अशांचा गर्व मी वाहिला ।
होता व्यर्थ; अशी प्रतीति मिळतें, तेव्हां खरी बुद्धिला ॥१॥

मायेचें घनजाल दृष्टिपुढुनी जें यौवनीं वाहतें ।
वृद्धांना दिसतेंच जें दुरुनिही; शून्यत्व तें झांकितें ॥
अंधाऱ्या अतिजीर्ण आत्मकुटितें छिद्रेंच जीं पाडिलीं–।
काळानेंच; नवप्रकाश शिरतो, त्यांच्यातुनी अंतरीं ॥२॥

जों जीं शाश्वतवास येइ जवळीं तों तों नरा येतसे ।
दौर्बल्यांतुन शक्ति; पक्वतरही तत्प्राज्ञता होतसे ॥
त्रैलोक्या बघतोच एक समयीं, जो जाइ हा सोडुनी ।
पाहे उंबरठयावरी नवजगाच्या जो उभा राहुनी ॥३॥

( ७ ) ( वसंततिलका )

देवापुढें परममंगल मंदिरांत ।
नीराजनीं थरथरे विझतीच ज्योत ॥
मांगल्ययुक्त; जरि अल्प दिसे प्रकाश ।
हृद्दीपिया वाटिच सुंदरता मुखास ॥१॥

येतां ऋतू शिशिर, कोमल पर्ण होई ।
पंडातपत्व अवघें विलयास जाई ॥

So is a woman,
With a *travel done.*
Her brood gone from her,
And her thoughts are still.

(8)

Some have *too much, yet still do crave,*
I little have, and seek no more,
They are but poor, though much they have,
And I am rich with little store.

(9) (*Warwick*)

Abundance *is a trouble,* want *is a misery*
Honour is a burden, baseness a scorn
Advancement dangerous, disgrace odious,
I will not climb lest I fall, nor lie down
lest I am troddon,
Only a competent state would yield
quiet of content !

(10) (W. *S.*)

Contentment is the best food *to preserve*
a sound man
& best medicine to restore a sick man.

(11) (*Cooke*)

That happy state of mind, so rarely
possessed when we say " I have
enough " is the highest attainment
of philosophy.'

आयु:प्रवास सरला, जवळींच अंत ।
वृद्धामुखीं दिसत तेज तसें प्रशांत ॥२॥

अल्पांशही खळखळाट नुरे मनांत ।
सारे विचार शमुनी जिथ शांत शांत ॥

( ८ ) ( वसंततिलका )

आधिक्यही असुनि तृप्त न होति कोणी !
मागें न मी अधिक, अल्पधनी असोनी ॥
आहे बहु, परि खरोखर ते भिकारी ।
अल्पस्व मी असुनिही अतिभाग्यशाली ॥

( ९ ) ( उपजाति )

समृद्धि वाटे बहु त्रासदायी । न्यूनत्वही कष्टद फार होई ॥
सन्मान होई जडभार माथीं । नीचत्व आणील तिरस्कृती वी॥
जाणें पुढें भीतिद वाटते तें । उद्वेगकारी स्थिति हीन होते ॥
पडें म्हणोनि नच मी चढेन । पडें न, कोणी तुडवी म्हणून॥
-मत्ता मिळो केवळ यापुरेशी । कीं तुष्टिची शांति मिळो मनाशी॥

( १० ) ( व. ति. )

आरोग्ययुक्त नर-सुस्थिति रक्षणास ।
संतोष हेंच अति उत्तम अन्न खास ॥
रोग्यास सुस्थिति पुनश्च मिळावयास ।
उत्कृष्ट औषध असे परितोष त्यास ॥

( ११ ) ( व. ति. )

अत्यंत दुर्मिळ सुखी स्थिति, कीं निभ्रांत ।
उद्गार तृप्तिमयची उठती मनांत ॥
जें तत्त्व चिंतन करून मिळावयाचें ।
सर्वोच्च त्यांत फल हें परितृप्ततेचें ॥

(12) (*M. B.*)

Cheerfulness & content, are great
beautifiers and famous preservers
*of youthful looks.*

(13) (*Brooks*)

A man may have enough wealth to sink him
But never enough to satisfy him.

(14) (*Bennett*)

He that loveth silver, will not be satisfied
with silver,
Nor he that loveth abundance with increase.

(15) (*Young*)

Contentment is a pearl of great price
& who-soever procures it
At the expense of ten thousand desires
Makes a happy purchase indeed!

---

## 20 Hope, Despair, Optimist & Pessimist

(1) (*Oscar Wilde*)

We did not dare to breathe a prayer,
Or give our anguish scope!
Something was dead in each of us,
And what was dead was Hope!

( १२ ) ( शा. वि. )

*आनंदीपण आणि तृप्ति असतीं सौंदर्यदायी महा ।*
तारुण्यांतिल चारुता टिकविण्या प्रख्यात दोन्ही पहा॥

( १३ ) ( आर्या )

जरि बुद्धविण्यापुरेशी ऐहिक मत्ता मिळेल मनुजाला ।
तीं हि ठरे न पुरेशी कधिंहि समाधान द्यावया त्याला ॥

( १४ ) ( व. ति. )

ज्यानें असेल रजताप्रति हाव चित्तीं ।
*तेंहि मिळून कधिं त्यास न होय तृप्ती ॥*
ज्यातें समृद्धि असते प्रिय तो कधींहि ।
लाभून वृद्धि कितिही, नच तृप्त होई ॥

( १५ ) ( व. ति. )

संतोष हें जगिं असे बहुमोल मोतीं ।
जाणून हें, विकत तें, जर लोक घेती ॥
देऊनिया दशसहस्रहि कामनांस ।
सौदा ठरेल सुखकारक तोहि त्यांस ॥

---

प्रकरण २०–आशा, निराशा, आशावाद, नैराश्यवाद.

( १ ) ( भु. प्र. )

कुणी प्रार्थनाही कराया धजेना ।
कुणाच्याहि दुःखास वाचा फुटेना ॥
इथें आमुच्याचो परी कांहि मेलें ।
पुरी मम आशा—तिचें प्रेत झालें ॥

(7)

There never was a cloud so heavy & black
That it had nowhere a silver-lining.
There never was a night so dreary & dark
That stars were not somewhere shining.

( 8 ) ( *Maclaren* )

Believe in the good side of men-It is optimism that really saves men.

---

( 21 ) Brave, Bravery, Daring

( 1 ) ( *Socrates* )

Fame is the perfume of heroic deeds.

( 2 ) ( *Virgil* )

Fortune favours the bold.

( 3 ) ( *R. Browning* )

One who never turned his back but marched
breast forward; never doubted clouds
would break.
Never dreamed though right was worsted,
wrong would triumph.
Held we fall to rise, are baffled to fight
Better sleep to wake.

( 4 ) ( *Dryden* )

Beware the fury of a patient man.

(७) (शा. वि.)

केव्हांही नव्हताच मेघ, इतुका काळा, नि ऐसा घन ।
कीं, चंदेरि किनार अल्पहि नसे कोठेंच त्यालागुन ॥
केव्हांहि नव्हती निशाहि—इतुकी काळी—अशी भीषण ।
कीं कोठेंहि न तारका लुकलुके त्या अंतराळांतुन ॥

(८) (शा. वि.)

मानव्यांत वसे शिवांश लव जो, विश्वास त्याचा धरा ।
आशावादचि हा खरोखर जगीं रक्षीतसे या नरा ॥

---

## प्रकरण २१—शूर, शौर्य, धैर्य.

(१) (मंदाक्रांता)

शूरत्वाचा परिमल जगीं वाहतो, तीच कीर्ति ।

(२) (भु. प्र.)

खरा धाडशी त्या वरी भाग्यलक्ष्मी ।

(३) (फटका)

खरा शूर तो पाठ न फिरवी, छातिठोकची चाल करी ।
कोसळतीलचि घोर मेघ याविषयीं कधि शंका न धरी ॥ १ ॥
न्याय्य पक्षही केव्हां कोठें हरलासे भासलें जरी ।
अन्यायाच्या विजयाची ज्या कल्पना न स्वप्नींहि परी ॥ २ ॥
अढळ असे विश्वास ज्यास कीं, उठूंच पडलों किती जरी ।
निजुनी जागत, अधिक चांगलें लढूंच हरल्यामुळें परी ॥ ३ ॥

(४) (व. ति.)

ज्या अंगिं राहत असे धृतिशांति थोर ।
त्याचाच राग परि भीतिद होय फार ! ॥

( 5 ) ( *Philip Frenean* )

O Washington ! thrice glorious name,
What due rewards can man decree—
Empires are far below thy aim,
And sceptres have no charms for thee.

( 6 )

Self-dependant power can time defy,
As rock resists the billows and the sky.

( 7 ) ( *William Collins* )

How sleep the brave, who sink to rest,
By all their country's wishes best !
When spring, with dewy fingers cold,
Returns to deck their hollowed mould,
She there shall dress a sweeter sod
Than Fairy's feet have ever trod.

By fancy hands their knell is rung,
By forms unseen their dirge is sung:
There Honour comes a pilgrim gray,
To bless the turf that wraps their clay,
And Freedom shall awhile repair,
To dwell, a weeping hermit there.

## (22) Nature

### (1) (*Wordsworth*)

### Let Nature be your teacher

Up! up! my friend, and quit your books;
Or surely you will grow double:
Up! up! my friend, and clear your looks;
Why all this toil and trouble?
  The Sun above the mountain's head,
  A freshening lustre mellow,
  Through all the long green fields
    has spread
  His first sweet evening yellow.
Books! it's a dull and endless strife
Come, hear the woodland Linnet,
How sweet his music! on my life
There is more of wisdom in it.
  And hark! how blithe the throstle sings!
  He too is no mean preacher:
  Come forth into the light of things
  Let Nature be your teacher.
She has a world of ready wealth,
Our minds and hearts to bless—
Spontaneous wisdom breathed by health
Truth breathed by cheerfulness.
  One impulse from the vernal wood,
  May teach you more of man,
  Of moral, evil and of good
  Than all the sages can.

*Sweet is the lore which* Nature brings;
Our meddling intellect,
Misshapes the beautious forms of things;
We murder to dissect,
Enough of Science and Art,
Close up these barren leaves,
Come forth and bring with you a heart,
*That watches and receives.*

(2) (*Francis* Bacon)

Nature *to* be commanded, must be obeyed.

(3) (*Longfellow*)

The day is done ! and the darkness
Falls from the wings of Night,
As a feather is wafted downward,
From an eagle in his flight.

(4) (S. B*utler*)

Self preservation, is the first law of nature.

(5) (*Defoe*)

*Nature has left this tincture in the blood,*
That all men would be tyrants,
if they could.

(6)

Nature, a mother, kind alike to all
Still grants her bliss, at labour's earnest call.

देई निसर्ग किती सुंदर ज्ञानकोश ।
बुद्धी मधें बुडबुडे अमुचीच खास ! ॥
सौंदर्य वस्तुगत नष्ट करून नामी ।
अंतर्दिदृक्षु करितो बघ खुन आम्ही ॥ ७ ॥

शास्त्रें, कला, सकल या क्षणि ये त्यजून
पानेंहि निष्फळ अशीं क्षणि घे मिटून ॥
ये घेउनी हृदयही असलें स्वःतोष–।
राखी निरीक्षणि तशी महर्णी जयास ॥ ८ ॥

( २ ) ( अनुष्टुप )

आज्ञा पाळूं निसर्गाची तरि तो दास होतसे ।

किंवा

( शार्दूलविक्रीडित )

आज्ञापालन हो करूनिच कुणी जिंकू निसर्गा शके ।

( ३ ) ( मंदाक्रांता )

गेला गेला दिवस सरला ! होत अंधार सारा ।
पंखातूनी जणुं रजनिच्या तोचि वाटे गळाला ॥
जैसा कोणी गरुड गगनीं मारतांना भरारी ।
त्याच्या पंखातुनि महिवरी तीं पिसेंची गळालीं ॥

( ४ ) ( शिखरिणी )

" स्वतःला रक्षावें " प्रथमचि असे सृष्टिनियम ।

( ५ ) ( आर्या )

सृष्टीनें द्रव्य असें मानवरक्तांत सोडिलें आहे ।
कीं ज्या शक्य असे तो, जुलुमी शास्त्याविना न कधिं राहे ॥

( ६ ) ( शार्दूलविक्रीडित )

ठेवी प्रेम निसर्गमाउलि जरी सर्वांवरी सारखें ।
आक्रंदे जधिं ' कष्ट ' बालक, करी त्याचीं खरीं कौतुकें ॥

(7) (W. B. *Rands*)

Great, wide, beautiful, wonderful, world?
With the wonderful water round you curled,
And the wonderful grass upon your breast
World! you are beautifully dressed!

या एकाच कवितेचें भाषांतर दोन वृत्तांत केलें आहे :—

(8) Laws of Nature

(*Ist Law of Newton*)

A thing which is stationary (will not move of its own accord;) will continue to be stationary, unless it is acted upon by an outside force. (a)

And a thing in motion, will continue to move in a straight line, with uniform motion, unless acted upon by an outside force. (b)

(*II Law*)

(a) An outside force always changes the momentum of a body, and the rate of that change, is proportional to the outside force;

(b) And the change takes place, in the direction, in which the outside force acts.

(७) (शा. वि.)

मोठें, सुंदर, भव्य, विस्मयद हें त्द्रूप भूदेवते ।
मोतींचें शत-अब्धिचें वलयहि शोभा किती आणतें ॥
शालू हा हिरवा, तृणें उगवलीं, त्यांचा जणूं भूवर ।
पुष्पें त्यांतचि गुंफुनी वनवलीं वस्त्रें तुझीं सुंदर ॥

(७) (पृथ्वी)

विशाल, तव भव्य विस्मयद रूप भूदेवते ।
समुद्रवलयांकितत्व तुज तें किती शोभतें ॥
दिसे हरितरंगि जें तृण तुझ्या शरीरावर ।
जणूं तुजसि अर्पितें हरितवस्त्रची सुंदर ॥

## ८ निसर्ग-नियम

### न्यूटनचे नियम

नियम १ ला (अ) (शा. वि.)

आहे जें स्थिर मूळचें, न कधिही होई स्वतां तें चल ।
बाह्याघात न होइ तोंवरि सदा तैसेंच तें राहिल !

नियम १ ला (ब) (आर्या)

चल वस्तु समवेगें सरलचि रेषेंत सतत जाईल ।
बाह्याघात न होई तोंवरि तैशीच जात राहील ॥

न्यूटनचा २ रा नियम (आर्या)

वस्तूच्या वस्तुबला, बाह्यप्रेरक सदाचि बदलितसे ।
ज्या गतिनें बदले तो, आघाताशीं प्रमाणशीर असे ॥ (अ)

बाह्यप्रेरक करितो, वस्तुबलाच्या दिशेंतही बदल ।
आघात ज्या दिशेनें, बदलहि त्याची दिशेंत होईल ॥ (ब)

(7) (W. B. Rands)

Great, wide, beautiful, wonderful, world ?
With the wonderful water round you curled,
And the wonderful grass upon your breast
World ! you are beautifully dressed !

या एकाच कवितेचें भाषांतर दोन वृत्तांत केलें आहे :—

(8) Laws of Nature

(*Ist Law of Newton*)

A thing which is stationary (will not move of its own accord;) will *continue to be* stationary, unless it is acted upon by an outside force. (a)

And a thing in motion, will continue to move in a straight line, with uniform motion, unless acted upon by an outside force. (b)

(*II Law*)

(a) An outside force always changes the momentum of a body, and the rate of that change, is proportional to the outside force;

(b) And the change takes place, in the direction, in which the outside force acts.

( ७ ) ( शा. वि. )

मोठें, सुंदर, भव्य, विस्मयद हें त्वद्रूप भूदेवते ।
मोतीचें शत-अब्धिचें वलयहि शोभा किती आणतें ॥
शाल्‌ हा हिरवा, तृणें उगवलीं, त्यांचा जणूं भूवर ।
पुष्पें त्यांतचि गुंफुनी बनवलीं वस्त्रें तुझीं सुंदर ॥

( ७ ) ( पृथ्वी )

विशाल, तव भव्य विस्मयद रूप भूदेवते ।
समुद्रवलयांकितत्व तुज तें किती शोभतें ॥
दिसे हरितरंगि जें तृण तुझ्या शरीरावर ।
जणूं तुजसि अर्पितें हरितवस्त्रची सुंदर ॥

## ८ निसर्ग-नियम

### न्यूटनचे नियम

नियम १ ला ( अ ) ( शा. वि. )

आहे जें स्थिर मूळचें, न कधिंही होई स्वतां तें चल ।
बाह्याघात न होइ तोंवरि सदा तैसेंच तें राहिल !

नियम १ ला ( ब ) ( आर्या )

चल वस्तू समवेगें सरलचि रेषेंत सतत जाईल ।
बाह्याघात न होई तोंवरि तैशीच जात राहील ॥

न्यूटनचा २ रा नियम ( आर्या )

वस्तूच्या वस्तुबला, बाह्यप्रेरक सदाचि बदलितसे ।
ज्या गतिनें बदले ती, आघाताशीं प्रमाणशीर असे ॥ ( अ )

बाह्यप्रेरक करितो, वस्तुबलाच्या दिशेतही बदल ।
आघात ज्या दिशेनें, बदलहि त्याची दिशेत होईल ॥ ( ब )

( *III Law* )

For every action, there is a reaction, which acts in the opposite direction, and is equal to the action.

*Boyle's Law* (of gases)

(Temperature being constant,) the volume and pressure of a gas, are in inverse proportion to each other; *i. e.* volume increases with decrease in pressure, and the product of volume and pressure is always constant !

( *Pascal's Law* )

No liquids can be compressed under pressure which is transmitted equally in all directions.

---

(23) Payers.

**Lead Kindly Light !**

(1) ( J. *H. Newman* )

Lead kindly light ! amid the encircling gloom
Lead Thou me on ! (1)
The night is dark, and I am far from home
Lead Thou me on. (2)
Keep Thou my feet, I do not ask to see
The distant scene. One step enough for me.(3)
I was not ever thus, nor prayed that Thou
Should'st lead me on. (4)

(पृथ्वी)

जरी घडतसे क्रिया, तिज प्रतिक्रिया ही तरी ।
विरुद्ध, समशक्तिनें युत, घडेल ती ही परी ॥

बॉइलचा वायुविषयक नियम (आर्या) '

वायूचा धर्म असा–(सुस्थिर जरि उष्णमान राहे तें) ।
व्यस्तप्रमाण, घनफळ, दाब, यांचें परस्परां असतें ॥
वाढे दाब जधीं तो, घनफळ संकोचही सदा वरितें ।
घनफळ, दाब गुणोनीं, एकचि संख्या सदा पहा येते ॥

पॅस्कलचा द्रवाविषयीं नियम (आर्या)

घनफळ कधीं द्रवाचें बदलेना दाब त्यास देवोनी ।
सर्व दिशांमधि जाई दाब सदा सारखा विभागोनीं ॥

—प्रसिद्ध 'सृष्टिज्ञान' मासिक, जुलै १९५२

---

प्रकरण २३–प्रार्थना

(१) (चाल:–केशवकरणी)

कृपाज्योति ! पथ दावि, येतसे विषण्णता घेरुनी ।
पुढति ने प्रकाश मज दावुनी ॥१॥
काळोखी ही निशा ! असें मी गृहापासुनी दुरी ।
दिसाया पंथ, दीप तूं धरीं ॥२॥
स्थिरपद करि, मज, इच्छा दुरिचें बघण्या कधिं होत न ।
पुष्ट मी एकच पद चालुन ॥३॥
अजवरि नव्हतों नम्र असा मी, कधिं न प्रार्थिलें तुला–
कीं, "प्रभो ! नेई पुढती मला" ॥४॥

I loved to choose and see my path, but now-
Lead Thou me on. (5)
I loved the garish day, and spite of fears
Pride ruled my will: remember not past years (6)
So long Thy power has blest me, sure it still,
Will lead me on, (7)
O'er moor and fen, o'r crag and torrant, till
the night is gone. (8)
And with the morn, those angel faces smile,
Which I loved long since and lost awhile !(9)

(2) (*H. F. Lyte*)

Abide with me:
Fast falls the even tide, (1)
The darkness deepens:
Lord ! with me abide (2)
When other helplers fail,
And comforts flee, (3)
Help of the helpless !
O abide with me ! (4)

(3) (*George Meridith*)

Who rises from Prayer a better man,
his prayer is answered.

(महात्मा गांधी यांच्या आश्रम-भजनावलीतून)

(4)

Take my life, and let it be,
Concecrated, Lord, to Thee;
Take my hands, and let them move
At the impulse of Thy love. (1)

अहंपणें वाटलें—" पंथ मम निवडुनि मी पाहतों " ।
पारि अतां गर्व गळे सर्व तो ॥५॥
गेलों फसव्या तेजा भाळुनि भयस्थानिं अगुनी ।
अहंकृति राज्य करी मन्मनीं ॥६॥
झालें गेलें विसर; त्वत्कृपा निभवुनि ने अजवरी ।
पुढेंही नेइल ही खातरी ॥७॥
कटेकपारी, दलदल यांतुनि, घो घो वृष्टींतुनी—।
दिवस ये रजनिहि तो लोपुनी ॥८॥
चिरप्रीति करनींहि विसरलों, ज्यांना मध्यंतरीं ।
अतां स्मित देवदूतगण करी ॥९॥

( २ ) ( चालः—केशवकरणी )

जीवनमार्गी ओशोटी ही त्वरें येतसे पहा—।
देवा, माझ्या सन्निध रहा ! ॥१॥
दिशा होउनी धुंद अधिकची अंधकार दाटला, ।
देवा, सोडुं नको रे मला ! ॥२॥
इतर सहायक सर्वहि हरले, सुखें पळालीं दुरी, ।
देवा, घेई मजला उरीं ! ॥३॥
असहायांचा सहायक खरा, देवा तूं एकला, ।
म्हणोनी शरण्य तूंची मला ॥४॥

( ३ ) ( चालः—गौरतनु जानकी )

शुद्धतर होत जो प्रार्थना करुनिया ।
प्रार्थना त्याचि ना जात वायां ॥

( ४ ) ( व. ति. )

घे जीवपुष्प मम हें, झणिं, हे दयाळा ! ।
राहो समर्पित सदा तुझिया पदाला ॥
स्वीकारि हस्त मम हे; चरणीं तयां हो ।
संप्रेरणा प्रणयची तव देत राहो ॥१॥

Take my moments and my days
Let them flow in ceaseless praise
Take my feet and let them be
Swift and beautiful for Thee. (2)

Take my voice and let me sing,
Always only for my king;
Take my lips and let them be
Filled with messages from Thee. (3)

Take my silver and my gold
Not a mite would I withhold.
Take my intellect and use
Every power as Thou shalt choose. (4)

Take my will, and make it Thine.
It shall be no longer mine.
Take my heart; it is Thine own;
It shall be Thy Royal Throne. (5)

Take my love, my Lord, I pour
At thy feet, its treasure-store
Take myself and I will be
Ever, only, all for Thee. (6)

( 5 ) ( *Harry Kemp* )

I kneel not now. to pray that Thou,
Make white one single sin—
I only kneel to thank Thee Lord !
For what I have not been !

( 6 )

Not the labour of my hands
Can fulfil Thy law's demands.

सारा पुनीत मम जीवनकाळ व्हावा ।
देवा ! तुझ्या स्मरनिं संतत तो वहावा ॥
सौंदर्य तेंवि चपलत्व पदांस यावें ।
कामीं तुझ्यास्तवचि तें परि येत जावें ॥२॥

कंठास या मधुरता प्रभुराज ! मोठी ।
गावोत हा सततही तुमच्याचसाठीं ॥
तूंतें समर्पण करीं मम ओंठही मीं ।
संदेशधारक तुझेच असोत नामीं ॥३॥

सौवर्ण रौप्य सगळें मम तूंच घे रे ।
अस्पांशही न मजसाठिंच राखियेलें ॥
घे बुद्धि ही ! सकल शक्तिहि त्यामधील ।
तूं वापरी तिज, जसें तुजला रुचेल ॥४॥

इच्छा तुलाच दिधली; कर आपुली ती ।
माझी न या पुढति ती कुठल्याच रीतीं ॥
अर्पीतसें हृदय; हेंहि तुझेंच होतें ।
सिंहासनत्वाचि तुझें मिळुं दे तयातें ॥५॥

हें प्रेम अर्पण करीं तव पायिं, देवा ।
त्याचा इथें रिचवितों, अनमोल ठेवा ॥
अतीं, मलाच प्रभु तूं अपुलें कराय ।
निःशेष केवळ तुझ्यास्तव मीं जगावें ॥६॥

(५) (सुमंदारमाला)

" करी शुद्ध तूं एकही पाप माझें—"
अशें मी न देवा तुला प्रार्थितों ।
न जें पाप केलें तयासाठिं देवा,-
तुझे आज आभार हे मानितों ॥

(६) (व. ति.)

हे हात कष्ट करिती कितीहि तरी तें ।
देवा ! तुझें नियतकार्य पुरें न होतें ॥

Could my zeal no respite know,
Could my tears for ever flow,
All for sin could not atone
Thou must save, and Thou alone.
Nothing in my hand I bring,
Simply to Thy cross I cling;
Naked, come to Thee for dress;
Helpless, look to Thee for grace;
Foul, I to the Fountain fly;
Wash me Saviour, or I die.

( 7 ) ( *John Burroughs* )

Serene I fold my hands and wait,
Nor care for wind or tide nor sea;
I rave no more 'gainst time or fate,
For God ! my own shall come to me.

(8)

—*He prayeth best who loveth best*
All things both great and small;
For the Dear God who loveth us
*He made and loveth all.*

(9)

—I pray not that Thou, give me tasks,
*Equal to my strength*,
I pray, that Thou give me strength
Equal to whatever task you choose to give.

( 10 )

—To labour is to pray.

---

उत्साह हा सतत कर्म करीत राहे ।
अश्रू जरी सतत वाहत राहिले हे ॥
संपूर्ण निष्कृति घडे न तरी अघाची ।
तूं एक राखि मजसी प्रभु एकलाची ॥१॥
आलों तुझ्याजवळि मी प्रभु ! रिक्तहस्तें ।
घालीन केवळ मिठी तुझिया पदांतें ॥
आलों दिगंबर, वस्त्रहि तूंच देई ।
निःसाह्य मी, तव कृपेचिच वाट पाही ॥
धावें मलीन बनुनी तुज निर्झरा ! हे ।
तूं ना धुशी, तरि मला गति मृत्यु राहे ॥२॥
( ७ ) ( शा. वि. )
जोडोनी कर हे, प्रशांत हृदयें मी वाट पाहें इथें ।
भीती, वादळ, ओहटी, न अथवा क्षुब्धाब्धिची वाटते ।
गान्हाणें न, विरुद्ध काल अथवा दुर्दैव याच्या, उरे ।
देवा ! येइल सर्वही परत जें माझें असे तें खरें ॥
( ८ ) ( व. ति. )
मोठी लहान किति वस्तु जरी असेल । प्रीती तयावर नितांतचि जो करील॥
देवाघरीं रुजु खरोखर तोंच होई । ती प्रार्थनाच मनुजा फल शीघ्र देई॥
जो देव प्रेम करितो तुज, तोच सृष्टी । निर्मून सर्व, करि तीवर प्रेमवृष्टी॥
( ९ ) ( सुमंदारमाला )
" प्रभो ! देइ कर्तव्य, शक्तीप्रमाणेंच,
माझ्या, " असें मीं न हें प्रार्थितों ॥
" जरी देशि कर्तव्य मोठेंहि, त्याच्या—
पुरेशी असो शक्ति," हें मागतों ॥
( १० ) ( सु. म. )
खरी प्रार्थना कष्टरूपेंच होई ।
किंवा ( शा. वि. )
कष्टें काम करूनियाच घडते देवा खरी प्रार्थना ।

## (24) Truth & False

(1) (*Babilonian Talmoud*)

This is the punishment of a liar:—he is not believed even when he speaks the truth.

(2)

A liar needs a good memory

(3) (*O. W. Holmes*)

Sin has many tools; but a lie is the handle which fits them all!

(4) (R. *Vines*)

It is man's perdition to be safe, when he ought to die for the truth!

(5) (*Emerson*)

Once at least in every life, God offers to every mind, its choice between—Truth and Repose! It is inevitable! Take what you please. But think thrice before you choose!
and its inevitable corollary—

(6) (*J. R. Lowell*)

Truth forever on the scaffold
Wrong forever on the throne!

---

## प्रकरण २४–सत्य, असत्य

(१) (पृथ्वी)

असत्य वदतो तया कडक हीच शिक्षा खरी ।
वदेल जरि सत्य त्या भरंवसा कुणी ना धरी ॥

(२) (पृथ्वी)

असत्य वदण्यासही स्मरणशक्ति तीव्रा हवी ।

(३) (फटका)

तऱ्हेतऱ्हेचीं विविध हत्यारें पाप वापरी निज हातें ।
असत्यरूपी मूठ तयांना सर्वांना सुंदर बसते ॥

(४) (स्रग्धरा)

सत्यासाठीं नरानें मरणशरणही नेघवा व्हावयाचें ।
राहावें सुस्थ तेव्हां, नरक मिळविणें याहुनी नान्य साचें ॥

(५) (व. ति.)

प्रत्येक जीवनिं कधीं तरि एकवार ।
निष्ठा-स्वयंवर घडे बहु दुर्निवार ॥
'आराम', 'सत्य' निघ होत उमेदवार ।
घ्या एक यांतुनि, समीक्षुनिया विचार ॥
(या स्वयंवराचा परिणाम शेवटीं असाच होतो–)
घ्या स्वस्थता प्रिय, अशा नरिं मानवाचा ।
'आराम' हाच बनतो सखया जिवाचा ॥
तो सत्यमार्ग परि कंटकपूर्ण भारी ।
तेथें दिसे सतत निर्जनताच सारी ॥

(६) (व. ति.)

फांशावरी सतत सत्यचि टांगलेलें ।
सिंहासनीं अनय बैसुनि नित्य डोले ॥

## (25) Justice, Law

(*1*) (*J. J. Roche*)

The net of low is spread so wide,
No sinner from its sweep may hide,
Its meshes are so fine and strong,
They take in, every child of wrong
O wondrous web of mystery!
Big fish alone escape from thee!

(2) (*Lokmanya Tilak*)

(In the 1908 Trial)

In spite of the verdict of the jury, I maintain that I am innocent! There are higher powers than this tribunal ! And it seems the will of Providence, that the cause I represent should prosper more, by my suffering, than my remaining free!

(*3*) (*Cicero.*)

Law are dumb in the midst of arms.

(*4*) (*Goldsmith*)

Laws grind the poor, and rich men rule the law.

(*5*) (*John Seleden*)

Ignorance of the law excuses no man.

## प्रकरण २५–न्याय, अन्याय

(१) (फटका)

विधिबंधांचें जाळें इतुकें दूर पसरलें चोंहिकडे ।
या विस्तारापलीकडे नच पापी कोणी कुठें दडे ॥१॥
छिद्रें इतुकीं बारिक याचीं, बळकट धागेही इतुके ।
कुमार्गगामी कीं नर कोणी सुटूं न याच्यांतून शके ॥२॥
विस्मयकारक गूढ जालका ! विचित्र वर्तन तुझें किती ।
केवळ मोठे मोठे मासे तुझ्या हातुनी बघ सुटती ॥३॥

(२) (शा. वि.)

पंचांनीं कसलाहि निर्णय दिला, त्यातें न मी मानतों ! ।
"नाहीं मी अपराधि!" सर्व जगता, ठासून हें सांगतों ॥
याही न्यायगृहाहुनी गुरुतरा ती ईशशक्ती असे ! ।
इच्छा त्या विधिचीच या प्रकरणीं मातें अशी ही दिसे–॥
कीं, कार्यप्रगती, विमुक्त असुनी मी, होतसे आजला ।
त्यापेक्षां मम बंधनेंच शतधा, यावी गती हो तिला ॥

(३) (आर्या)

विधिबंधहि होति मुके शस्त्रांचा खणखणाट हो जेथें ।

(४) (अभंग)

निर्बंधाच्या जातणींत । गायगरिबातें दळीत ॥
परि त्या जात्याचा मालक । आहे पहा हा धनिक ॥

(५) (शालिनी)

"निर्बंधांचें ज्ञान नाहीं" म्हणोनी, न्यायागारीं जाइना तो सुटोनी ।

(६) (इंद्रवज्रा)

दास्यत्व अन्याय्य जरी नसेल । अन्याय्य कांहींच जगीं नुरेल ॥

(7)

Revenge is a kind of wild justice.

(8)

In righting wrong—
We sometimes wrong the right !

(9)

'Tis with our judgements, as with our watches, none go just alike, yet each believes his own.

---

(26) Greatness

(1) (*Shakespeare*)
Cardinal Wolsey

Farewell, a long farewell, to all
my greatness !
This is the state of man; today
he puts forth,
The tender leaves of hope;
tomorrow blossoms,
And bears his blushing honours thick
upon him;
The third day comes a frost, a killing frost,
And when he thinks, good easy man,
full surely
His greatness is aripening, nips his root,
And then he falls as I do. I have ventured

Like little wanton boys that swim
on bladders
This many summers in a sea of glory;
But far beyond my depth: my high
blown pride
At length broke under me and now has
left me.
Weary and old with service, to the mercy
Of a rude stream, that must for ever
hide me.

(2) (*Shakespeare*)

Be not afraid of greatness–
Some are born great
Some achieve greatness
Some have greatness thrust upon them.

(3) (*P. J. Proudhon*)

The great are only great because we are
on our knees.

---

(27) Miscellaneous lyrics

*To a sky-lark*

(*P. B. Shelley*)

Hail to thee, blithe spirit!
Bird thou never wert
That from heaven or near it

उन्मार्गगामी जशीं पोरटीं तीं जळीं पोहतीं हो फुगे घेउनी ।
किती हे उन्हाळे यशःसागरीं मी तसा राहिलों धाडसें पोहुनी ॥ ५ ॥

मारीच गेलों अवांक्यापुढें मी, अहंकाररूपी फुगा ताणुनी ।
माझ्याच भाराचिया खालतीं तो फुटे अंतिं; जाई मला सोडुनी ॥६॥

मी हा असा वृद्धही मंगलेला– असे एक आधार तो जातसे ।
जलौघांत या क्रूर आतां बुडोनी मरावेंचि हें या कपाळीं असे ॥ ७ ॥

( २ ) ( भु. प्र. )

कधीं थोरवीची धरावी न भीति ।
सुजन्मामुळेंची कुणी थोर होती ॥
कुणा स्वप्रयत्नेंच ये थोरवी ती ।
कुणाला बळानेंच मोठे करी ती ॥

( ३ ) (फटका)

गुडघे टेकुनि विनम्र झालों आपण सारेही म्हणुनी ।
थोरांची ती सर्व थोरता टिकुनी राहे हो अजुनी ॥

---

## प्रकरण २७ वें:––संकीर्ण खंडकाव्यें

### चंडोलास

( वसंततिलका )

चंडोल ! हे मुदित सत्त्व ! तुला नमस्ते ।
पक्षी कधींच नव्हतास असेंच वाटे ॥
स्वर्गांत वा वसुनि तेथचि आसपास ।

Pourest thy full heart
In profuse strains of
Unpremeditated art! 1

Higher still and higher,
From the earth thou springest,
Like a cloud of fire;
The blue deep thou wingest,
And singing still dost soar
And soaring ever singest. 2

In the golden lightning
Of the sunken sun,
Over which clouds are brightening,
Thou dost float and run;
Like an unbodied joy
Whose race is just begun. 3

The pale purple even
Melts around thy flight;
Like a star of heaven,
In the broad day-light,
Thou art unseen,
But yet I hear thy shrill delight. 4

Keen as are the arrows
Of that silver sphere
Whose intense lamp narrows
In the white dawn clear,
Until we hardly see
We feel it is there. 5

संपूर्ण हें हृदय तूं तव ओततोस ॥
आधीं विचार करुनी नच जी प्रयुक्त ।
ऐशी कला विपुल दाविशि तूं सुरांत ॥ १ ॥

सोडून पापमय या जगतास नीच ।
जाशी नभांत अधिकाधिक उंच उंच ॥
ज्वालाघनासमचि तूं जणुं मूर्तिमंत ।
गंभीर नील असल्या उडसी नभांत ॥
तूं गात गात नभिं मारिशि रे भरारी ।
गातोस नित्य उडतां उडतांहि भारी ॥ २ ॥

जेव्हां सहस्रकर अस्तगिरीस जात ।
सौवर्णरंग उधळी सगळ्या नभांत ॥
तेणेंच उज्ज्वलपणा जधिं ये घनांस ।
वेगें तयांवरुनि तूंहि तरंगतोस ॥
आयुःप्रवास नुकताच सुरू जयाचा ।
ऐसा अदेह जणुं मोद बनून साचा ॥ ३ ॥

संध्या सुनील मृदुरंग तुझ्यासभोंतीं ।
त्यांतून तूंहि उडतां वितळोनि जाती ॥
तारा प्रकाशमयशा दिवसां जसा तो ।
लोपून सूर्यकिरणांत अदृश्य होतो ॥
तैसाच तूं न दिसशी तरिही तुझा तो ।
आनंद तीव्र, मम कर्णपथांत येतो ॥ ४ ॥

तेजस्वि तो रजतगोल शशी नभांत ।
पेशी सुतीक्ष्ण करवाण जरी निरंत ॥
येतां पहाट नभिंच्या धवल प्रभेत ।
संकोचुनीच शशिदीपक होय लुप्त ॥
कधी दिसून पडला नयनां जरी तो ।
त्याही स्थितीत हृदयास प्रतीत होतो ॥५॥

All the earth and air
With thy voice is loud,
As when night is bare,
With one lonely cloud
The moon rains out her beams
And heaven is overflowed. 6

What thou art, we know not,
What is most like thee ?
From rainbow clouds there flow not
Drops so bright to see,
As from thy presence showers
A rain of melody ! 7

Like a poet hidden
In the light of thought
Singing hymns unbidden
Till the world is wrought
To sympathy with hopes and fears
It heeded not 8

Like a high born maiden
In her palace tower,
Soothing her love-laden
Soul in secret hour
With music sweet as love
Which overflows her bower : 9

Like a glow worm golden
In a dale of dew,
Scattering unbeholden

तारस्वरांकित तुझ्या अतिगोड नादें ।
पृथ्वी नि वायु भरुनी अवघे निनादे ॥
रात्रीं प्रकाश दिसतें नभ सर्व, जेव्हां ।
त्यांतून एकचि फिरे घनखंड, तेव्हां; ॥
वृष्टी सुधामय करीं करितो विधू तो ।
वाटे भरून जणुं स्वर्ग ऊतूंच जातो ॥ ६ ॥

" तूं काय रे असशि " मी नच जाणितों हें ।
अत्यंत त्वत्सम असें जगिं काय आहे ? ॥
मेघांश इंद्रधनु रंगवितो प्रकाम ।
तद्विन्दुही न इतुके नयनाभिराम ॥
आनंद देइ जितुकी तव गानवृष्टि ।
स्वर्गोवुनी करिशि जी, सुखवीत सृष्टि ॥७॥

तूं भासशी कवि जणूं स्वविचारमग्न ।
स्फूर्तिप्रभेंत अपुल्या बसला लपून ॥
काव्यें अयाचित सदा रचितो अशीं तीं ।
जीं प्रेरितीं जनमनांत सहानुभूति ॥
आशा नि भीति कविच्या पटल्या न आधीं ।
लोकांस त्या सुकविता, पटवून देतीं ॥८॥

कन्याच या गमसि उच्चकुलीन कोणी ।
प्रासादिं उंच अपुल्या जणुं ती बसोनी ॥
भारावलें हृदय जें बहु प्रेमभारें ।
एकांत पाहुनी तया सुखवावया रे ॥
स्वप्रीतितुल्य जधि सुंदर गोड गाई ।
तें गीत मंदिर भरून उतूंच जाई ॥९॥

तू स्वर्णरंगि अथवा, जणुं काजव्याची-।
काळी दरींत बनली दव मौक्तिकांची ॥
पुष्पें तृणांकुर जिथे भरुनी समस्त ।

Its aerial hue
Among the flowers and grass
Which screen it from the view: 10

Like a rose embowered
In its own green leaves
By warm winds deflowered
Till the scent it gives
Makes faint with too much sweet
These heavy winged thieves. 11

Sound of vernal showers
On the twinkling grass
Rain-awakened flowers
All that ever was
Joyous and clear and fresh
Thy music doth surpass. 12

Teach us, sprite or bird!
What sweet thoughts are thine;
I have never heard
Praise of love or wine
That panted forth a flood
Of rapture so divine. 13

Chorus hymeneal,
Or triumphal chaunt
Matched with thine would be all
But an empty vaunt—
A thing wherein we feel
There is some hidden want. 14

'झांकोनि त्यास न कुणाहि दिसूंच देत ॥
टाको अलक्षित मरून तदंतरंग ।
देऊन त्यांस निज धूसर वायुरंग ॥१०॥

जैसा गुलाब नटवी निज रूप कांत ।
पानांचियाच अवघ्या अवगुंठनांत ॥
त्या पुष्पहीन करितो जधिं उष्णवात ।
त्यांचा सुगंध अवघाच लुटून नेत ॥
चोरांस पक्षजड त्यां; अतिगोड वास ।
दे तोच भान हरुनी परिमूर्च्छनेस ॥११॥

वृष्टी वसंतऋतुची झुलत्या तृणांत ।
कर्णाभिराम करिते किति गोड नाद ॥
वृष्टीमुळें विकच तें किति पुष्प साजे ! ।
जें जें जगांत अति मोदक, शुद्ध, ताजें–॥
सर्वांस त्यां, सकल सुंदर सद्‌गुणांत ।
मागेंच सारिल परी तव गोड गीत ॥१२॥

तूं वन्यदेव अथवा जरि पक्षि या रे ।
मातें तुझे शिकव गोड विचार सारे ॥
प्रेमास या कवि कुणी स्तविती सुरेला ।
त्यांतून मोद इतुका न उतास आला ॥
जैसा तुझ्या दिसतसे स्वरसापनेंत ।
अत्युच्च मोद तसला न कुठें जगांत ॥१३॥

तें वृंदगान मृदु, मंगल मंदिरींचें ।
अत्युग्र वा विजयघोषहि तें रणींचे ॥
त्यांची करून तुलना तुझिया स्वरांशीं ।
ती वल्गना सकल फोल गमे मनाशी ॥
सांगूं शकूं न, परिही पटते मनांत ।
आहे उणीव कसली तरि गुप्त त्यांत ॥१४॥

*What objects are the fountains*
*Of thy happy strain?*
What fields, or waves or mountains?
What shapes of sky or plain?
What love of thine own kind?
What ignorance of pain? 15

With thy clear keen joyance
Languor cannot be:
Shadow of annoyance
Never came near thee;
Thou *lovest*, but never knew
Love's sad satiety. 16

Waking or asleep
Thou of death must deem,
Things more true and deep
Than we mortals dream,
Or how could thy notes flow
In such a crystal stream? 17

We look before and after
And pine for what is not;
Our sincerest laughter
With some pain is fraught;
Our sweetest songs are those—
That tell of saddest thought. 18

Yet if we could scorn
Hate and pride and fear;
If we were things born,

तूं सूर जे मधुर काढिशि सुप्रसन्न ।
सर्वांस त्या उगम, सांग, मिळे कुठून ? ॥
क्षेत्रीं, तरंगिं, अथवा कुठल्या गिरींत ? ।
कैशा प्रदेशिं अथवा कसल्या नभांत ? ॥
त्वज्जातिचा प्रणय कीं विकची तुला तें ? ।
कीं दुःखहीन तव सुस्थिति बोलवीते ? ॥ १५ ॥

तूं सर्वदा असशि मोदभरें भरून ।
उत्साहहीन तुजला स्थिति ये कुठून ? ॥
आनंदमग्न असतां तुजला दुरून, ।
संत्रस्तता कधिंहि स्पर्श करूं शके न ॥
अत्यंत प्रेम करिशी; परि तें करून ।
त्यांतील दुष्ट अतिरेकहि जाणशी न ॥१६॥

स्वप्नांतही न कधिं मर्त्यमनांत येई ।
त्याहून सत्य नि गभीरचि वस्तुचेंही—॥
वा मृत्युचें, करिशि चिंतन तू मनांत ।
निद्रेंतही असुनि वा तव जागृतींत ॥
तैसें नसे तर तुझ्या स्वरनिर्झरांतें ।
ये स्वच्छता स्फटिकवत् कुठुनी ? वदे तें ॥१७॥

मागें पुढें बघुनिया ( बनुनी तृषार्त ) ।
नाहीं तयास्तव सदा झुरतों मनांत ॥
आलें उचंबळुनि हास्य तरी तयांत ।
थोडें तरी मिसळुनी मनिं दुःख होत ॥
अत्यंत गोड अमुचीं जगिं होति गाणीं ।
अत्यंत दुःखमय जीं कथितीं कहाणी ॥१८॥

झालों समर्थ जरि मी अवमानण्यास ।
हे द्वेष, गर्व अथवा भयभीति यांस ॥
नाहीं प्रसंग कधिं अश्रु गाळण्याचा ।

Not to shed a tear
I know not how thy joy
We ever could come near. 19

Better than all measures
Of delight and sound,
Better than all treasures
That in books are found
Thy skill to poet were
Thou scorner of the ground ! 20

Teach me half the gladness
That thy brain must know,
Such harmonius madness
From my lips would flow,
The world should listen then. 21
As I am listening now

(*2*) The Rest is but Leather & *Prunello*

*Pope :*

Honour and shame from no condition rise,
Act well your part, there all the honour lies.
Fortune in man has some small difference made
One flaunts in rags, one flutters in brocade; 1

The cobler aproned, the parson gowned,
The frier hooded, and the monarch crowned
" What difference more " (you cry)
than crown or cowl ?
I tell you friend; "a wise man and a fool." 2

लाभे जरी मनासि जन्म असा सुखाचा ॥
आनंद त्वद्हृदयिं जो भरनीच राही ।
माझा तया–निकट येइल कां तरीही ! ॥१९॥

मोदाहुनी कितितरी अतिमोदकारी ।
मंजुध्वनीहुनि मनाप्रति मोहकारी ॥
जे वाङ्मयीन निधि थोरहि पुस्तकांचे ।
त्याहूनही सरस कौशल त्वत्स्वरांचें ॥
कौशल्य तेंच रुचतें कवि–अंतरंगा ।
भूमीस तुच्छ गणितो असल्या विहंगा ! ॥२०॥

जो मोद भूषित करी तव अंतरंगा ।
त्यांतील अर्ध शिकवी मज तूं विहंगा ! ॥
उन्मत्त गीत मग सु-स्वर-संगतींचें—– ।
ओठांतुनी मम निघेल असेंच कीं जें— ॥
राहील ऐकताचि हें जग नादमोहें ।
आम्ही जसे स्वर अतां तव ऐकतों हे ॥ २१ ॥

## ( २ ) श्रृंगार प्रेतावरी !

( शा. वि. )

पाह्योपाधि कधीं न देति मनुजा, उच्चत्व वा नीचता ।
कर्तव्या करण्यातची घडतसे ती सर्व सन्मान्यता ॥
दैवानें जरि बाह्यभेद दिसला, तो अल्पची वाटतो ।
चिंध्या पांघरि एक; वस्त्र दुसरा उंची जरी नेसतो ॥१॥

घामारा मलवस्त्र तें; गुरुजिंना ती शालजोडी नवी ।
भिक्षूला कफनी परी मुकुट दो राजास त्या भूषवी ॥
प्रश्नीं दोघि पुसाल "काय इतुका हा भेद मोठा असे ?"
दोघी उत्तर, "छट, मूर्ख इतुका हा भेद मोठा नसे" ॥ २ ॥

You will find, if once the monarch
    acts the monk,
Or cobbler-like the parson will be drunk
Worth makes the man, and want of it,
    the fellow,
*The rest is all but leather and prunello.* 3

### (3) (*Wordsworth*)

### *What man has made of man!*

I heard a thousand blended notes,
While in a grove I sate reclined,
In that sweet mood, when pleasant thoughts,
Bring sad thoughts to the mind. (1)
    To her fair work did nature link,
    The human soul that through me ran
    And much it grieved my heart to think—
    " What man has made of man ! " (2)
Through primrose tufts, in that sweet bower,
The periwinkle trailed its wreaths;
And 'tis my faith that every flower
Enjoys the air it breathes. (3)
    The birds around me hopped and played;
    Their thoughts I cannot measure,
    But the least motion that they made
    It seemed a thrill of pleasure. (4)
The budding twigs spread out their fan
To catch the breezy air;
And I must think, do all I can,
That there was pleasure there. (5)

### (4 a) Ease

I would not from the wise require
The lumber of their learned lore;
Nor would I from the rich desire
A single counter of their store. 1

For I have ease, and I have health,
And I have spirits, light as air,
And more than wisdom, more than wealth
A merry heart that laughs at care ! 2

### Longfellow :

### (5) (' *Footsteps of Angels* ')

When the hours of day are numbered,
And the voices of the night
Wake the better soul, that slumbered,
To a holy calm delight, 1

Ere the evening lamps are lighted
And like phantoms grim and tall
Shadows from the fitful fire light
Dance upon the parlour wall. 2

Then the forms of the departed,
Enter at the open door;
The beloved, the true hearted,
Come to visit me once more. 3

He, the young and strong who cherished
Noble longings for the strife,

By the roadside fell and perished
Weary with the march of life ! 4

They the holy ones and weakly
Who the cross of suffering bore
Folded their pale hands so meekly-
(Spoke with us on earth no more.) 5

And with them the being beautious,
Who unto my youth was given,
More than all things else to love me
And is now a saint in heaven. 6

With a slow and noiseless foot-s tep
Comes that messenger divine,
Takes the vacant chair beside me,
Lays her gentle hand in mine. 7

And she sits and gazes at me,
With those deep and tender eyes,
Like the stars so still and saint-like,
Looking downward from the skies 8

Uttered not, yet comprehended,
Is the spirit's voiceless prayer,
Soft rebukes in blessings ended,
Breathing from her lips of air. 9

O, though oft depressed and lonely,
All my fears are laid aside,
If I but remember only,
Such as these have lived and died. 10

### O Solitude !

(6) (*Couper*)

' Alexander Selkirk '

I am the monarch of all I survey !
My right there's none to dispute;
From the centre all round to the sea,
I am lord of the foul and the brute ! 1

Oh Solitude ! where are the charms,
That sages have seen in thy face !
Better dwell *in the midst of* alarms
Than reign in this horrible place ! 2

*I am out of humanity's reach;*
I must finish my journey alone;
Never hear the sweet music of speech,—
I start at the sound of my own ! 3

The beasts that roam over the plain
My form with indifferance see;
They are so unacqainted with men
Their *tameness is shocking to me !* 4

Society, friendship and love,
Divinely bestowed upon man,
O, had I wings of a dove
How *soon would I taste these again.* 5

My sorrows then I might assuage
In the ways of religion and truth,
Might I learn from the wisdom of age,
And be cheered by the sallies of youth. 6

( ६ ) ( शिखरिणी )

निर्मनुष्य अशा बेटावर जाऊन पडलेल्या माणसाचे उद्गार—

हे एकांता !

दिसे जें जें त्याचा नृपतिसम हा मीच इथला ।
न माझ्या हक्काचा इथ कुणि विरोधीहि दिसला ॥
समुद्रावेरी या इथुन चहुंबाजूंस, सगळे ।
पशू, पक्षी, यांचें अधिपपण मातेंच मिळलें ॥१॥

कुठें बा एकान्ता ! रुचिर तव सौंदर्य सगळें ।
मुनींना जें शान्या तव वदनि या पूर्वि दिसलें ? ॥
भय स्थानींही तें कितीतरि बरें हो निवसणें ।
नको ऐशा घोरस्थळिं परि कधीं राज्य करणें ॥२॥

अवांक्यावाहेरी सकलहि नरांच्या वसतसे ।
स्वयात्रा एकाकी मजसि करणें भागाचि असे ॥
न ये कानीं वाणीकृत मधुर संगीतरव तो ।
स्वतांची वाणीही परिसुनि स्वता मी दचकतों ॥३॥

गुरेंढोरें येथें कितिक कुरणांतून फिरतीं ।
मला पाहोनी त्यां जणुं न मुळिं कांहींच गणती ॥
मनुष्याशीं त्यांचा परिचयचि शून्यांश बघुनी ।
गरीबी त्यांची ती मज घडवि आघातचि मनीं ॥४॥

नरा प्रीती, मैत्री, समरुचि समाजांत वसति ।
कृपेनें ईशाच्या, वरचि जणुं हे थोर मिळती ॥
अहा ! वाटे ! हंसापरि जर मला पंख असते ।
पुन्हा तीं चाखाया त्वरित वपु हें खास उडतें ॥५॥

पुनर्लाभें त्यांच्या मम सकल दुःखा शमवितों ।
सदा सत्या-धर्मा अनुसरुनि लोकांत वसतों ।
गुरूंच्या वृद्धांच्या बसुनि चरणीं ज्ञान शिकतों ।
पयोनी तारुण्य—स्फुरित मम नैराश्य हरतों ॥ ६ ॥

There is mercy in every place;
And mercy ! encouraging thought !
Gives even affliction a grace,
And reconciles man to his lot ! 14

---

## (28) Proverbs etc.

(1)

A little nonsence now and then
Is relished by the best of men !
O they are after-all men !

(2) ( *Shakespeare* )

To gild refined gold, to paint the lily
To throw a perfume on the violet,
To smooth the ice, or add another hue
Unto the rainbow, or with taper light,
To seek the beautious eye of heaven
to garnish
Is wasteful and ridiculous excess.

(3)

Man shall not live by bread alone.

(4)

What's one man's poison, is another man's
meat or drink.

(5) ( *Franklin* )

Experience keeps a dear school,
Yet fools will learn in no others.

दुसऱ्या देशींचे गगन मणि शशांक भरलें ।
दया ! या शब्दानें हृदयिं किति उत्तेजन मिळे ॥
तिच्यायोगें दुःखांतहि दिसत सौंदर्य भरतें ।
तदाधारें येथें मनुज निजदेवास मिळतो ॥ १४ ॥

---

प्रकरण २८—छोट्या म्हणी

(१) (मंदाक्रांता)

केला थोडा अचरटपणा जो आपुलीमधुनी ।
सर्वश्रेष्ठांहि रपटले, मानवी ते म्हणोनी ! ॥

(२) (फटका)

शुद्धीकृत सोन्यास मुलामा करणें; कमळा रंगविणें ।
सौरभमंडित चंपकावरी द्रव्य सुगंधी शिंपडणें ॥
निसर्गनिर्मित मृदुल हिमातें मृदुतर करण्यातें झटणें ।
इंद्रधनुष्यामधें आणखी रंगछटांची भर करणें ॥
स्वर्गनेत्रसम सुंदर सूर्या समईनें हो शोभविणें ।
व्यर्थव्यर्थची हास्यास्पद हा अतिरेक असा कुणि करणें ॥

(३) (आर्या)

केवळ अन्न मिळोनी भूक न भागे कधींच मनुजाची ॥

(४) (मंदाक्रांता)

एकाला जें विषसम असे, अमृतची तें दुज्याला ॥

(५) (आर्या)

‘ अनुभव ’ नामक गुरुजी ज्यांची चालवी महागडी शाळा ।
त्यांच्या मूर्खांना परि दुसरी कुठली मिळे न शिकण्याला ॥

( 6 )

A good follower of today, is a good
leader of tomorrow.

( 7 )

Prejudice is the child of ignorance.

( 8 )

Beauty unadorned is adorned most.

( 9 )

Little strokes fell great oaks.

( 10 )

Take care of pennies, and pounds will
take care of themselves.

( 11 ) ( *Thomas Hood* )

Evil is wrought by want of thought,
As well as want of heart

( 12 )

Pride goeth forth on horseback,
grand and grey,
But cometh back on foot and begs its way.

( 13 )

Idleness is like the rust of the soul.

( 14 )

Well begun is half done.

( 15 )

Virtue is for the most part, selflove in disguise

( 16 )

"What thing in the world was more universed
than anything else ?— "

( ६ ) ( आर्या )

आज खरा अनुयायी तोचि पुढारी उद्यां खरा होई ॥

( ७ ) ( मालिनी )

अपसमज असे हो पुत्र अज्ञानतेचा ॥

( ८ ) ( उपजाति )

अभूषिता सुंदरता असेल । अत्यंत सालंकृत ती दिसेल ॥

( ९ ) ( शा. वि. )

अल्पच्छेद हळूंहळूंहि करितां भंगे महावृक्षही ॥

( १० ) ( शा. वि. )

अल्पातें नपतां स्वयेंच मिळतें मोठयांस संरक्षण ॥

( ११ ) ( आर्या )

घडती अविचारानें, हृदयहीनतेमुळें अनर्थ तसे ॥

( १२ ) ( शा. वि. )

अश्वारूढ, सहर्ष, ऐटित पुढें नाहीं अहंकार तो ।
येतांना परि भीक मागत असा मार्गी, पदीं चालतो ॥

( १३ ) ( शार्दूलविक्रीडित )

लोखंडावरि गंज, तेंवि गमतें आत्म्यास आलस्य तें ॥

( १४ ) ( शार्दूलविक्रीडित )

अर्धें कार्यचि जाहलें, जरि घडे आरंभची उत्तम ॥

( १५ ) ( शार्दूलविक्रीडित )

आत्मप्रेमची सद्गुणांत बहुधा प्रच्छन्नरूपें वसे ॥

( १६ ) ( शार्दूलविक्रीडित )

"सर्वव्यापि अशी जगांत कुठली वस्तू तुम्हां वाटते ? ।"

"Hope ! it remained with those who had nothing else left."

(17)

Be not forgetful to entertain strangers, for thereby some have entertained angels unawares.

(18) (*Shakespeare* :)

Sweet are the uses of adversity;
Which, like the toad, ugly and venomous
Wears yet a precious jewel in his head.

(19)

Where there's a will, there's a way.

(20)

If wishes were horses, beggers would ride.

(21)

To be content with what one has, is the greatest happiness & He who increases his desires, increases his cares also.

(22)

The prodigal robs his heir,
The miser robs himself.

(23)

Look before you leap.

(24) (*W. C. Hazlit*)

For every evil under sun,
There is a remedy, or there is none.
If there be one, try and find it,
If there be none, never mind it.

"निःस्वाऱ्याहि मनांत मूळ धरूनी आशाच जी राहते ॥"

( १७ ) ( शा. वि. )
सेवा सज्जनिं नेणतां घडविं तें आतिथ्य सोडूं नये ।

( १८ ) ( शिखरिणी )
( नसे वस्तू कीं जी खरि निरुपयोगी दिसतसे । )
कडू आपत्तीही मधुर परिणामी ठरतसे ॥
विषारी या भीतिप्रद जरि गमे नागहि, परी ।
बहू मोलाचा तो सुविमल मणी मस्तकिं धरी ॥

( १९ ) ( इंद्रवज्रा )
इच्छा जिथें, मार्गहि तेथ आहे ।

( २० ) ( उपजाति )
इच्छा जरी अश्व कुणी असेल । भिकारिही त्यावरतीं बसेल ॥

( २१ ) ( शार्दूलविक्रीडित )
आहे त्यांतचि नित्य तृप्त असणें ही सौख्यसीमा खरी ।
इच्छावृद्धि करी तया हृदयिंची वाढेल चिंता परी ॥

( २२ ) ( पृथ्वी )
लुटीत उघळ्या वसे सतत वारसांचें धन ।
परी कृपण चोरतो धन स्वतां स्वतांपासून ॥

( २३ ) ( शिखरिणी )
उडी घेण्यापूर्वी सतत बघणें नीट पुढचें ॥

( २४ ) ( फटका )
जगिं जें वाइट, उपाय त्याला
अंसे तरी वा नसे तरी, ।
असेल तर तो वर्ले शोधी;
नसेल तर चिंता न करी ॥

is the principal difference between a man and a dog!

(36) (*J. B. Massien* :)

Gratitude is the memory of the heart.

(37)

Affected simplicity is refined artfulness.

(38)

There is none so poor as a wealthy miser.

(39) (*Burton* :)

If there be a hell upon earth,
It is to be found in melancholy man's heart!

(40)

If all the year were playing holidays,
To sport would be as tedious as work.'

(41)

A thundering cloud-seldom brings rain.

(42) (*W. G. Brown* :)

The sweetest sounds to mortals given—
are heard in Mother, Home & Heaven.

(43) (*Harold Begbie* :)

A homeless man is sad to see.
But sadder far, a man so hard—
That from all beauty, kindness, love,
His soul is barred.

(44)

Mid pleasures and palaces;
Though we may roam,

( ३६ ) साकी

हृदयाची या स्मरणशक्ति जी, कृतज्ञता तिज म्हणती ।

( ३७ ) ( उपजाति )

अघेपणा कृत्रिम दाखवावा । सफाइचा धूर्तपणा म्हणावा ॥

( ३८ ) ( उपजाति )

संपत्तिशाली कृपणासमान । गरीब कोणी नच ये दिसून ॥

( ३९ ) ( व. ति. )

" आहे कुठें नरक तो जर या जगांत !। "
राहेच खिन्न सुविषण्ण अशा मनांत ॥

( ४० ) ( शा. वि. )

वर्षांचे सगळे जरी दिवस ते खेळावया लाभले ।
कामाचेसम खेळणेंहि बनतें कंटाळवाणें खरें ॥

( ४१ ) ( पृथ्वी )

करी गडगडाट तो घन कधीं क्वचित् वर्षतो ।

( ४२ ) ( आर्या )

गृह, जननी, स्वर्ग, असे मधुरतम ध्वनि नरास हे तीन ।

( ४३ ) ( व. ति. )

ज्याते उरे न घरदार कुठे जगात ।
दुःखी जरी दिसतसे नर तो नितांत ॥
दुःखी तयाहुनिहि, ज्यास जगात कोठें ।
सौंदर्य, प्रेम, करुणा, हृदया न भेटे ॥

( ४४ ) ( व. ति. )

लाभे कधी विरस राजपथात घास ।
मोठे घरी कधि मिळे सुख या जिवास ॥

Be it ever so humble
*There's no place like home!*

(45) (*Shakespeare*:)
Uneasy lies the head that wears a crown.

(46)
It is never too late to mend.

(47) (*Socrates*:)
Other men live to eat, while I eat to live.

(48)
Hold your tongue; and you can hold anything.

(49) (*R. Cumberland*:)
It is better to wear out than to rust out.

(50)
Hypocracy is better than crime.

(51) (*Shakespeare*:)
Crabbed age and youth never lie together.

(52)
Youth is the time when seeds of character are sown.

(53) (*Longfellow*:)
The heights by great men reached and kept
Were not attained by sudden flight;
But they, while their companions slept
Were toiling upward in the night.

(54) (*Wordsworth*:)
Child is the father of man.

दारिद्र्यही जरि घरांत भरून राही ।
नाहीं घराहुनि जगीं प्रिय अन्य कांहीं ॥

( ४५ ) ( उपेंद्रवज्रा )

किरीट ज्या मस्तकिं शोभताहे । चिंताग्निही त्यासचि जाळताहे ॥

( ४६ ) ( पृथ्वी )

दुरुस्त करण्यास चूक न उशीर होई कधीं ॥

( ४७ ) ( फटका )

खाण्यासाठीं दुसरे जगतीं, जगण्यासाठीं मी खातों ।

( ४८ ) ( शा. वि. )

जिव्हेला धरुं जो शके, न घरणें कांहीं तया दुर्घट ।

( ४९ ) ( शा. वि. )

नावें गंजुनि यापरीस बरवें जाणें झिजोनी पुरें ।

( ५० ) ( अनुष्टुप )

निर्दोषत्या गुन्ह्याहूनी बरें ढोंगहि तें जनीं ।

( ५१ ) ( शा. वि. )

तारुण्यांतह वास तें विरचिरें वार्धक्य कैसें करी ? ॥

( ५२ ) ( शा. वि. )

तारुण्यांतच शीलबीज रुजतें मातींत या देहिच्या ॥

( ५३ ) ( शा. वि. )

थोरांनीं मिळवून उच्च अर्धि जीं स्थानें पहा राखिलीं ।
उड्डानें करनी अचानक अशीं त्यांना न तीं लाभलीं ॥
रात्रीं ते सहकारि सर्वहि सुखें होते जधीं झोपले ।
तेव्हां जागत राहुनी, ( न कळतां कोणास ) ते चढले ॥

( ५४ ) ( अनुष्टुप )

थोरांचें बीज थोरांत, येई नित्य दिसून तें ॥

(55)

Procrastination is the thief of time.

(56) (*Dryden* :)

Errors like straw, on the surface flow,
He who would search for pearls, must dive below.

(57)

The evil that men do, lives after them,
The good is often interred with their bones.

(58) (La *Rachefaucauld* :)

Hypocracy is the homage, that vice pays to virtue.

(59) (*Shakespeare* :)

Misery acquaints a man with *strange* bed-fellows.

(60) (*Cerventes* :)

He preaches well, who *lives* well.

(61)

Blessed are the meek : for they shall inherit the world.

(62) (*Shakespeare* :)

What is in a name ? That we call a rose,
By any other name would smell as sweet !

(63) (St. *Augustine* :)

Necessity knows no law.

(64)

Necessity is the mother of invention.

(65)

Cleanliness is next to Godliness.

(66)

What stronger breast-plate than heart untainted?

(67)

Thou hast been called, O Sleep!
the friend of woe;
But 'tis the happy that have called you so.

(68)

There is many a slip between a cup and lip.

(69)

Be thou familiar, but by no means vulgar.

(70)

Prevention is better than cure.

(71)

All the horror is just in this—
"That there is no horror!"

(72)

The man who never looks backward to his ancestors, will not look forward to posterity.

(73)

Where the sun enters never, the doctor enters often.

(६५) (उपेंद्रवज्रा)

स्वसा कनिष्ठा जणु "देव"–तेची।
जगीं असे निर्मलताच साची॥

(६६) (व. ति.)

ज्याचें सदा हृदय निर्मलची असेल।
वक्षस्त्र त्याहुनि बलिष्ठ कुठें मिळेल ?॥

(६७) (शा. वि.)

निद्रादेवि ! सखी तुला म्हणति या दुःखी जनांची जरी।
खोटें नाम सुखी जनेंच तुजला हें ठेवियेलें परी॥

(६८) (स्रग्धरा)

ओठापर्यंत येतां किति पतनभयें येति पेल्यास भारी।

(६९) (मालिनी)

परिचय घडतांहि नैव अश्लील व्हावें।

(७०) (अनुष्टुप)

निष्कृती करण्यापेक्षां परिहारचि उत्तम।

(७१) (व. ति.)

अत्यंत घोर घटना जगिं हीच खास।
पापांत खंत नुरते जधिं मानवास॥

(७२) (शा. वि.)

जो कोणी निजपूर्वजांप्रति कधीं ना पाहतो आदरें।
आशास्थान पुढील संततिमधें कोठून त्यातें उरे ?॥

(७१) (उपजाति)

प्रकाश जेथें न शिरे रवीचा।
वैद्या तिथें आश्रय हो सदाचा॥

(74)

Make hay while the sun shines.

( 75) ( *Scott* : )

O what a tangled web we weave,
when first we practice to deceive!

( 76 ) ( *Shakespeare* : )

O, it is excellant to have a giant's strength,
But is tyranous to use it like a giant.

( 77 )

A drowning man will catch a straw.

( 78 ) ( *Shakespeare* : )

Cowards die many a time before
their deaths.
The valiant never taste of death, but once.

( 79 ) ( *La Rachefoucault* : )

We promise according to our hopes,
And perform according to our fears.

( 80 ) ( *Longfellow* : )

Nor deem the irrevocable past
As wholly wasted, wholly vain,
If rising on it's wrecks, at last,
To something nobler we attain.

( 81 )

Men are cruel, but man is kind.

( 82 ) ( *Blake* : )

The man who never alters his opinion, is like standing water—and breeds reptiles of the mind.

( ७४ ) ( भु. प्र. )

असे जोंवरी स्वच्छ सूर्यप्रकाश
क्षणीं तोंवरी कापुनी घेइ घास ।।

( ७५ ) ( शा. वि. )

जेव्हां मी फसवावयाच्या प्रथमची कामास आरंभतों ।
जें गुंतून पडेन मीच, असलें जाळेंच तें गुंफितों ॥

( ७६ ) ( शा. वि. )

आहे उत्तम, अंगि थोर असणें त्या राक्षसाचें बळ ।
त्यातें त्यासम वापरी जरि कुणी, होई जगाचा छळ ।।

( ७७ ) ( पृथ्वी )

जळीं बुडत तो धरील अति शुष्कशाही तृणा ।

( ७८ ) ( फटका )

मरणापूर्वी भित्रे सारे कितीक वेळां मरतात ।
खरे शूर ते वची मृत्युची एकवारची घेतात ।।

( ७९ ) ( भु. प्र. )

आशानुसारी वचनास देतों ।
साधेल ते भीतिमुळें करीतों ।।

( ८० ) ( फटका )

भूतकालिं जें केलें—सर्वचि केवळ व्यर्थ न तें झालें ।
जर्जर त्याच्या पायावर जर सुंदरतर मंदिर रचिलें ॥

( ८१ ) ( पृथ्वी )

मनुष्यकरणी जरी घतत क्रूर देवी दिसे ।
परी मनुजता दयामय अशीच देवी असे ।।

( ८२ ) ( स्रग्धरा )

केव्हांही जो मतांतें फिरवि न, जणुं तो सांचलेलेंच पाणी ।
जन्मोनी तेथ जैसे वळवळति किडे, तन्मनीं त्याचवाणी ।।

(92)

*Do unto others, as you would be done by.*

(93) (*Sir Walter Raleigh* :)

The tongue may tell, what eyes discover.
Joys unseen are sung never.

(94)

Every man desires to live long,
But no man would be old.

(95)

It is with our passions, as it is with fire and water; they are good servants but bad masters.

(96) (Pope :)

On life's vast ocean, diversely we sail,
Reason's the card, but passion's the gale.

(97) (*Cowper* :)

Reasoning at every step he treads
Man yet mistakes his way;
While meaner things, whom instinct leads
Are rarely known to stray.

(98) (C. M. *Schweb* :)

Personality is to man, what perfume is to flower.

(99) (*Oliver Cromwell* :)

Put your trust in God my boy!
But always keep your powder dry!

(९२) (मु. प्र.)

रुचे वागणें जें दुज्याचें तुझ्याशीं ।
तशी वृत्ति ठेवीत जा तूं दुज्याशीं ॥

(९३) (व. ति.)

नेत्रां दिसेल तितुकेंच वदेल वाणी ।
गाऊं शके न कधि मोद अदृश्य कोणी ॥

(९४) (मु. प्र.)

हवें दीर्घ आयुष्यची सर्व लोकां ।
कुणीही परी वृद्धता मागतो का ? ।

(९५) (मु. प्र.)

जसे अग्नि, पाणी, तसे हे विकार ।
वरे मूल्य तेंची, घनी दुष्ट फार ॥

(९६) (फटका)

अफाट जीवनसागरिं नेतों भरकट नौका कुठंतरी ।
विवेक वाटे मार्गदर्शिका–विकार परि वादळापरी ॥

(९७) (व. ति.)

चाले विचार करुनीच पदापदाला ।
तोही मनुष्य चुकतोच तरी पथाला ॥
जे क्षुद्र जीव मति योजिति जन्मभात ।
त्यांचा चुके पथ असें विरळाच होत ॥

(९८) (आर्या)

व्यक्तित्व हें नसावें जैसें सौरभ्य होय कुसुमातें ।

(९९) (मु. प्र.)

नरी चालवी भार देवावरी रे ।
सदा सिद्ध ठेवां तुम्हीं सर्व दारें ॥

(110) (*Cotton:*)

All power always corrupts
and absolute power corrupts absolutely.
Power will intoxicate the best hearts
as wine the strongest heads.
No man is wise enough or good enough
to be trusted with unlimited power.

(111)

Habits soon become second nature,
Nothing easier to form, nothing harder
to break.

(112)

Acts make habit, and habits
make character.

(113) (*Lord Bacon:*)

The virtue of prosperity is temperance, the virtue of adversity is fortitude,...... certainly virtue is like precious odours, most fragrant when they are incenced, or crushed; for prosperity doth best discover vice; but adversity doth best discover virtue.

(114) (*Pope:*)

Good nature and good sense must ever join
To err is human, to forgive divine.

(115) (*Cotton:*)

Imitation is the sincerest of flattery.

(116) (*Shakespeare:*)

One may smile and smile, and be a villain.

(117)

Handsome is, who handsome does.

(118)

The fear of the Lord, is the begining of wisdom.

(119) (*Lord* Bacon :)

Thus by preserving the method of nature, in the conduct of state, in what we improve- we are never wholly new; and in what we retain; we are never wholly obsolete.

(120) (*Johnson :*)

No man is a hypocrite in his pleasures.

(121)

A thing of beauty is a joy for ever.

(122)

Constant dropping wears great stones.

(123) (*Shakespeare* :)

When sorrows come, thy do not come single spies,
But in battalians.

(124) (*R. Mannyng* :)

He that will not when he may,
He shall not when he will.

(125)

Opportunities which are lost, seldom return.

(120)

Though without a tongue, murder will some day speak.

# कांहीं निवडक अभिप्राय



१. श्री. विंझे यांनीं संस्कृत व इंग्रजी वाङ्मयाचें रसग्रहणपूर्वक वाचन करीत असतां जो आनंद स्वतः घेतला तो आपल्या मराठी वाचकांना देण्याकरितां, इंग्रजी व संस्कृत वाङ्मयांतील सरस स्थळांचें सुरस मराठींत भाषांतर करण्याचा उद्योग सध्यां ते करीत आहेत. त्यांची भाषांतरशैली मूळांतील अर्थसौंदर्य सुबोध रीतीनें व्यक्त करणारी असल्यामुळें प्रसादपूर्ण झाली आहे......हें काव्य भाषांतरात्मक आहे हें सागावें तेव्हांच कळतें, इतकें भाषांतर सुरेख झालें आहे. इंग्रजीप्रमाणेंच संस्कृत कवितांचींहि सुरेख भाषांतरें त्यांनीं केलीं आहेत तीं रसिकांस आवडतील आणि व आनंद देतील असा विश्वास वाटतो.

२७-५-५२ डॉ. शंकर दामोदर पेंडसे,

एम्. ए., एम्. ओ. एल्., पीएच्. डी.

मराठीचे प्राध्यापक, हिस्लाप कॉलेज, नागपूर.

२. श्री. ल. गो. विंझे यांसी— महाशय,

आपल्या कविता मीं वाचल्या. आपण केलेलीं संस्कृत, इंग्रजी सुभाषितांचीं भाषांतरें इतकीं सरळ वठलीं आहेत कीं, तीं भाषांतरें आहेत असें मुळींच वाटूं नये. आपली कविता रसाळ नि सहजसुंदर आहे. त्यांत कृत्रिम ओढाताण मुळींच नाहीं......आपण इंग्रजी सुभाषितांचीं जीं रूपांतरें मराठींत केलीं आहेत तीं मराठी काव्यास नवीन नि सरस लेणें अर्पिल्यासारखीं उचित आहेत.

१०-१०-५२ स्वातंत्र्यवीर डॉ. वि. दा. सावरकर,

भूतपूर्व अध्यक्ष—मराठी साहित्यसंमेलन

३. श्री. ल. गो. विंझे यांसी,

आपलीं पद्यात्मक भाषांतरें मीं काल लक्ष्यपूर्वक ऐकलीं. अत्यंत संतोष झाला. आपण अत्यंत रसिक आहां, मार्मिक आहां; शब्द-योजना सुश्लिष्ट व कर्णमधुर करतां; मूळ कवीचा अभिप्राय जशाचा तसा स्वभाषेंत उतरवण्याची आपली शक्ति खरोखरच आनंद उत्पन्न करते. प्रसाद हा तर आपल्या रचनेचा प्रधान गुण आहे. सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्रकृति इतकी खालावली असतां उगाच कुरकुर न करतां आपण हें विद्येचें काम हातीं घेतलें व इतकें चांगलें करून दाखविलें! आपणास परिपूर्ण यश येवो व सुदीर्घ आयुष्य व उत्तम आरोग्य लाभो अशी देवास प्रार्थना आहे.

२७-५-५२ प्रा. श्री. म. माटे, एम्. ए.

४. ...अध्यापन व टीकालेखन या दोन्ही क्षेत्रांतील अनुभवामुळें, भाषांतर--त्यांतून काव्याचें भाषांतर करणें हें काम किती कठिण आहे याची मला पूर्ण जाणीव आहे. कै. माधवराव पटवर्धनांसारख्या विद्वान् कवींनाहि अशा प्रयोगांत केवढे प्रयास पडत, हें मीं प्रत्यक्ष पाहिलेलें आहे. या दृष्टीनेंच मी श्री. विंझे यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों. अर्थ व मूळांतील बारकावे आणणें, समवृत्त साधणें, शक्य तों मुळांतील लयींचें वजनहि साधणें वगैरे करामती पाहून श्री. विंझे यांना ही विशेष देणगी आहे असें वाटल्यावाचून राहात नाहीं.

त्यांतूनहि हें विशेष कीं, श्री. विंझे यांचें संस्कृत व मराठीचें वाचन फार मार्मिक आहे. त्यामुळें त्यांनीं भाषांतराकरितां निवडलेल्या वेच्यांना दुर्मिळ रत्नांचें महत्त्व आहे.

श्री. विंझे यांनीं मूळ 'रत्नौघ' आपलीं 'भाषांतर मौक्तिकें' जरूर प्रकाशांत आणावीं. त्यांच्या पुस्तकानें वाङ्मयाच्या एका अवघड पण आल्हादकारक विभागांत उत्कृष्ट भर पडेल.

१९-७-५१ प्रा. श्री. के. क्षीरसागर,
अमळनेर मराठी साहित्यसंमेलनाच्या 'टीकाशास्त्र' शाखेचे अध्यक्ष.

५. …कित्येक परिचित इंग्रजी कविता, सुभाषितात्मक वाक्यें यांचे श्री. विंझे यांनीं सुरेख अनुवाद केले आहेत.…अनुवादाच्या मराठीपणांत कोठेंहि न्यून नाहीं. उलट थोडक्या जागेंत बरेच अर्थगौरव साधून मूळांतील अर्थप्रतीति चांगली होते. मूळ अर्थ अधिकांत अधिक प्रमाणांत भाषांतरांत आणणें, मूळास सोडून न जाणें, फार काय त्या त्या ओळींचा अर्थ तेवढ्याच जागेंत आणणें व हें सर्व वृत्त व यमक बंधन स्वीकारून करणें या गोष्टी श्री. विंझे लीलया करूं शकतात याचा मोठाच आनंद व बरेंच नवल वाटलें. सर्वच रचनेमधील प्रसादपूर्णता फार आल्हादकारक वाटली. श्री. विंझे यांनीं अनुवादकलेवर असाधारण प्रभुत्व मिळविलें आहे यांत शंका नाहीं.…त्यांचें रचनाप्रभुत्व पाहून व वाङ्मयाभिरुचि लक्षांत घेतां त्यांनीं स्वतंत्र काव्यरचना कां करूं नये असा विचार मनांत येतो. पण स्वतंत्रपणें न केली तरी अनुवादरूपानें मराठी काव्य समृद्ध करण्याची कामगिरी केली तरी मराठी वाचक त्यांचा आभारी होईल.

प्रा. रा. श्री. जोग. एम्. ए.
मराठीचे प्राध्यापक, फर्ग्युसन कॉलेज.

६. श्री. ल. गो. विंझे यांनीं केलेलीं कांहीं इंग्रजी व संस्कृत कवितांचीं मराठी भाषांतरें मीं वाचून पाहिलीं. मूळचा आशय मराठी पद्यांत उत्तम रीतीनें व्यक्त झालेला असून…एकंदरींनें श्री. विंझे यांची भाषांतर करण्याची हातोटी फार वाखाणण्यासारखी आहे. त्यांची मराठी भाषा सुबोध, प्रसन्न व शुद्ध असते. या भाषांतराच्या कलेंतील नैपुण्याबद्दल मी त्यांचें अभिनंदन करतों.

डॉ. के. ना. वाटवे एम्. ए. पीएच्. डी.

७. श्री. विंझे यांच्या भाषांतरित कवितांतून काव्य दुथडी भरून वहात आहे. ते सांधे, सोपें व मूळाचें यथार्थ प्रतिबिंब आहे. यांत मूळांतील पदांचा अनुक्रम देखील संभाळून शिवाय अतिशय काव्य-माधुर्य भरलें आहे.……भाषांतरें काटेकोरपणें मूळाशीं ताडून पाहणें हें फार क्लिष्ट व किचकट काम असतें व विद्वानांकडूनहि तें क्वचितच घडतें—याचा फायदा भाषांतरकर्त्यांला मिळतो…परंतु आपण करीत आहां अशा प्रयत्नांनीं ही स्थिति पालटेल.

आपण बहुभाषिक आहां, यामुळें आपण अनेक भाषांतील काव्यरत्नें मराठी भाषेच्या कोंदणांत बसवून 'भाषासुवर्णकार' ही पदवी प्राप्त करून घ्याल यांत शंका नाहीं.

कौपर कवींच्या England with all thy faults या कवितेतील I would not exchange याचें "न घेईन पक्षाचही तें तुज्याचें—शिळी भाकरी आइची ती खरी" या एकदम हृदयाशीं जाऊन भिडणाऱ्या शब्दांत आपण जें भाषांतर केलें त्यांत मूळांतील भाव अधिक सरस रीतीनें व्यक्त झाला आहे.…आपण प्रासादिक कवि आहां अशी माझी खात्री झाली आहे.

रा. ब. के. वि. गोडबोले, बी. ए., एल्एल्. बी.
'महाराष्ट्र शाकुंतल' कर्ते; माजी दिवाण, फलटण संस्थान.

७. श्री. ल. गो. विंझे यांस,

आपला कवितासंग्रह मीं वाचून पाहिला. भाषांतराकरितां अनेक इंग्रजी कवींच्या काव्याची जी निवड आपण केली आहे ती सुबक, सुंदर व अर्थपूर्ण अशा काव्यांचीच आहे. मूळ काव्यकुसुमांतील सुगंध व प्रफुल्लता भाषांतरांत टवटवीत ठेवण्यांत आली आहे हें या काव्यांतील कोणत्याहि चार ओळी पटवून देतात. भाषा प्रसादपूर्ण व नादमधुर असल्यानें मराठी भाषांतर काव्यांत आपण बहुमोलाची भर टाकली आहे.

२-९-५२ प्रा. द. के. केळकर, बी. ए.
मराठीचे प्राध्यापक, रामनारायण रुइया कॉलेज, मुंबई.

८. श्री. ल. गो. विंझे यांसी,

कळविण्यास आनंद वाटतो की, आपली इंग्रजी काव्यसूक्तींची 'पाणपोई' 'प्रसाद' मध्यें येते, याबद्दल अनेकांनी मला धन्यवाद दिले. 'पाणपोई' अतिशय लोकप्रिय झाली आहे. 'प्रसाद' मध्यें आपलें एखादें कायमचें सदर सुरू करावें असें ठरविलें आहे....

१२–५–५४ यशवंत गोपाळ जोशी, संपादक 'प्रसाद'

९. श्री. ल. गो. विंझे यांनी केलेलीं इंग्रजी व संस्कृत कवितांचीं मराठी रूपांतरें मीं बरीचशीं पाहिलीं. कांहीं 'सह्याद्री' त प्रसिद्ध झालेलीं आहेत.... यथार्थ व मूळास धरून रूपांतर करण्याचा त्यांचा कटाक्ष असतो. तसेंच रूपांतर हें रूपांतर न वाटता मूळच मराठींत आहे असें वाटावें इतकी कुशलता त्यांना प्रयत्नानें साध्य झाली आहे ...अशा भाषांतरांसाठीं उभय भाषांचा मार्मिक अभ्यास लागतो तसा विंझे यांचा आहे.... प्रौढ विद्यार्थ्यांसाठीं हीं रूपांतरें प्रसिद्ध करण्यासारखीं असून, मराठीच्या अभ्यासक्रमांतील क्रमिक पुस्तकांतूनहि घेण्यासारखीं आहेत.

२२–५–५२ श्री. ग. वि. केतकर बी. ए., एलूएल्. बी.
संपादक, केसरी.

१० श्री. ल. गो. विंझे यांनी संस्कृत, इंग्रजी कवितांचे अनुवाद केलेले मीं वाचून पाहिले. ...काव्य फारच सुबोध व प्रासादिक वाटतें.... वाचतां वाचतांच अर्थ उमगतो. मूळ काव्याच्या अंतरंगांत शिरून त्याचें मर्म त्यांनीं शुद्ध मराठींत आणलें आहे. त्यांनीं आतां स्वतंत्र काव्यरचनेचा प्रयत्न करावा.. स्वतःच्या स्वतंत्र प्रतिभेचें काव्यहि ते निर्माण करूं शकतील......

२०|७|५३ डॉ. ग. श्री. खैर एम्. ए. पीएच्. डी.

१२. श्री. ल. गो. विंझे यांनी संस्कृत, इंग्रजी, हिंदी, गुजराथी या भाषांतील ग्रंथांतून वेचक भाग घेऊन त्यांना मराठींत काव्यरूप पेहराव दिला आहे, तो चांगला झाला आहे .... यांत विचार-परिप्लुत व अर्थपूर्ण अशीं नानाविध अवतरणें असून, कांहीं म्हणी व वाक्प्रचार यांचाहि समावेश आहे..... मूळच्या विचारांचें मराठी रूपांतर श्री. विंझे यांनीं यथायोग्य करून त्यांतील रस व रहस्य हीं दोन्हीं मराठींत उत्तम तऱ्हेनें उतरविलीं आहेत.......त्यांच्या योग्य अशा अर्थपूर्ण शब्दयोजनेबद्दल व सुलभ अशा भाषाशैलीबद्दल आदर वाटला. हा संग्रह म्हणजे उत्तम विचारांचा अमोल साठा असून तो वाचनीय झाला आहे.

प्रा. डॉ. न. का. घारपुरे एम्. ए., एल्एल्. बी , पीएच्. डी.

१३. श्री. ल. गो. विंझे यांनीं आपली अनुवादित कविता मला ऐकविली. त्या आनंदांत गेलेले दोन तास कायमचे आठवणींत रहातील. अनुवाद करणें वाटतें तितकें सोपें नाहीं. मूळांतील सरसतेला धोका येईल असा अनुवाद काय कामाचा ! त्यानें मूळाला अन्याय होतो आणि आपण हात दाखवून अवलक्षण करून घेतों. पण श्री. विंझे यांचें अनुवादकौशल्य प्रशंसनीय आहे. मूळाला धरून, रंगछटा न गमावतां सरस व सुबोध अनुवाद करण्यांत श्री. विंझे यांनीं आपलें पटुत्व चांगलेंच सिद्ध केलें आहे. जगन्नाथ पंडितानें रमणीयार्थाची जी व्याख्या केली आहे त्या व्याख्येच्या कसोटीस श्री. विंझे यांचे अनुवाद उतरतात. मूळ भाषांत नसणारास त्यांच्या कवितांत स्वतंत्र रचनेचा साक्षात्कारहि अनुभवाऽ दावा इतकी त्यांत सुललितता आहे.

२६-५-५१ 'यशवंत' दिनकर पेंढारकर
भूतपूर्व राजकवि, बडोदे दरबार

१४. श्री. ल. गो. विंझे यांनीं आजारपणांत मनाला विरंगुळा म्हणून जी इंग्रजी, संस्कृत काव्यांचीं मराठींत भाषांतरें केलीं तीं इतकीं उत्तम साधलीं कीं, त्या कवींच्या अनेक जुन्या मराठी रूपांतरांपेक्षां विंझे यांचें रूपांतर अधिक सरस उतरलें आहे. त्यांत संपूर्ण अर्थ उतरला आहे. मराठीची घाटणी साधली आहे. भाषेंत प्रसाद आहे—सोपेपणा आहे आणि माधुर्यहि आहे.······विंझे यांची भाषांतरित कविता कित्येक प्रसंगीं मूळच्या कवितेहून सरस उतरली आहे हें लिहावयास आनंद वाटतो.

श्री. शंकर रामचंद्र दाते, बी. ए.
संपादक–' काळ ', पुणें.

१५. भाषांतरकला ही अति अवघड कला आहे. एका दृष्टीनें स्वतंत्र लेखन करणें परवडतें, पण भाषांतर करणें नको असें होऊन जातें. कारण स्वतंत्र लेखनांत आपणांला स्वैरसंचार करतां येतो व कल्पनाशक्तीला अनिर्बंधपणें वावरतां येतें. पण भाषांतर करतांना मूळांतील आशय यथार्थपणें व्यक्त करण्याची जबाबदारी व मूळ लेखकाला अन्याय होऊं न देण्याची खबरदारी घ्यावी लागते. त्यांतूनहि गद्यापेक्षां काव्याचें व तेंहि काव्यांत भाषांतर करणें अधिकच कठिण. मूळांतील रस भाषांतरित काव्यांत आणण्याला अभिजात रसिकता व भाषाप्रभुत्व लागतें. तें श्री. विंझे यांच्या ठिकाणीं मोठ्या प्रमाणांत असलेलें पाहून समाधान वाटलें. भाषांतरासाठीं सुभाषितें व विचारप्रधान कविता प्राधान्येंकरून निवडण्यांत श्री. विंझे यांनीं मोठी चतुराई व औचित्यबुद्धि प्रकट केली आहे.·· भाषांतरें प्रासादिक व रसाळ झालीं आहेत. इंग्रजीपैकीं 'The Pride of Dying for Thee', 'I vow to thee my Country', 'The Character of a happy man', 'Death the Leveller' या कवितांचें भाषांतर मला फारच आवडलें.

प्रा. वि. ह. कुलकर्णी, एम्. ए.
इंग्रजीचे प्राध्यापक, रामनारायण रुइया कॉलेज, मुंबई.

# सूचि

◆◆◆